शिक्षणखात्याचा मंजुरी क्रमांक: पापुमं/१०९४/१४५८६/७/प्रभा (मराठी), स (पु),
दिनांक ८-१२-१९९४

इयत्ता सातवी

मराठी

# बालभारती



महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळ,
पुणे.

प्रथमावृत्ती : १९९५
पुनर्मुद्रण : २००७



मराठी भाषा समिती :
**डॉ. मधुकर आष्टीकर**, अध्यक्ष
**डॉ. भाऊ मांडवकर**, सदस्य
**श्री. दया पवार**, सदस्य
**श्री. व्यंकटेश चौधरी**, सदस्य
**श्री. नरहर मंद्रूपकर**, सदस्य
**सौ. प्रतिभा जंगले**, सदस्य
**श्री. माधव राजगुरू**, सदस्य-सचिव

संयोजन प्रमुख : माधव राजगुरू, विशेषाधिकारी, मराठी विभाग, पाठ्यपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळ, पुणे.

चित्रकार : श्री. जयप्रकाश जगताप, पुणे

मुखपृष्ठ : श्री. शेणॉय

निर्मिती : श्री. प्रमोद शिरोडकर, मुख्य निर्मिती अधिकारी
श्री. संजय कांबळे, निर्मिती अधिकारी

अक्षरजुळणी : मे. फोटोकॉम्प्स सिस्टिम्स,
४२, करीम चेंबर, अंबालाल दोशी मार्ग, मुंबई-४०० ०२३.
टाईप नटराज. पॉईंट साईज १५/१३

कागद : ६० जी.एस.एम., क्रीम वोव्ह.

मुद्रणादेश : N / PTG / TB / 2007-08 / 2.00

मुद्रक : Runa Graphics, Pune

प्रकाशक : डॉ. वसंत काळपांडे.
नियंत्रक,
पाठ्यपुस्तक निर्मिती मंडळ, प्रभादेवी, मुंबई – ४०००२५.

# प्रतिज्ञा

भारत माझा देश आहे.
सारे भारतीय माझे
बांधव आहेत.
माझ्या देशावर माझे प्रेम आहे.
माझ्या देशातल्या समृद्ध आणि
विविधतेने नटलेल्या परंपरांचा मला अभिमान आहे.
त्या परंपरांचा पाईक होण्याची पात्रता
माझ्या अंगी यावी म्हणून मी सदैव प्रयत्न करीन.
मी माझ्या पालकांचा, गुरुजनांचा
आणि वडीलधाऱ्या माणसांचा मान ठेवीन
आणि प्रत्येकाशी सौजन्याने वागेन.
माझा देश आणि माझे देशबांधव
यांच्याशी निष्ठा राखण्याची
मी प्रतिज्ञा करीत आहे.
त्यांचे कल्याण आणि
त्यांची समृद्धी
ह्यांतच माझे
सौख्य सामावले
आहे.

## प्रस्तावना

'राष्ट्रीय शैक्षणिक धोरण-१९८६' अनुसार महाराष्ट्र राज्यात 'प्राथमिक शिक्षण अभ्यासक्रम-१९८८' तयार करण्यात आला. या शासनमान्य अभ्यासक्रमावर आधारित मराठी भाषा विषयाची इयत्ता पहिली ते आठवीची नवीन 'बालभारती' माला १९८९-९० या शालेय वर्षापासून पाठ्यपुस्तक मंडळ क्रमश: प्रकाशित करत आहे. या मालेतील सातवे पुस्तक आपल्या हाती देताना आम्हांला विशेष आनंद वाटतो.

सहाव्या इयत्तेपासून शालेय अभ्यासक्रमाचा उच्च प्राथमिक स्तर सुरू होतो. मातृभाषेच्या अभ्यासक्रमाचा हा उच्च स्तर लक्षात घेऊन या पुस्तकाची रचना केलेली आहे.

आकलन आणि अभिव्यक्ती उच्च पातळीवरून साधणे विद्यार्थ्याला शक्य व्हावे, हा उद्देश डोळ्यांपुढे ठेवून पाठांची योजना केलेली आहे. प्रत्येक पाठाच्या शेवटी दिलेले प्रश्न व स्वाध्याय मातृभाषेच्या अभ्यासक्रमाची उद्दिष्टे साध्य करण्यास उपयोगी ठरतील.

सातव्या इयत्तेत अपेक्षित असलेले व्याकरण पाठानंतर लगेच देण्यात आलेले आहे.

विद्यार्थ्यांना शब्दकोश पाहण्याची सवय लागावी, म्हणून सहाव्या इयत्तेत पाठातील शब्दांचे अर्थ त्या त्या पाठाच्या शीर्षकाखाली शब्दकोश पद्धतीने दिले होते. मात्र या सातव्या इयत्तेच्या पुस्तकात शेवटी गद्य व पद्य पाठांतील सर्व शब्दांचे अर्थ एकत्रित व शब्दकोश पद्धतीने दिलेले आहेत.

महाराष्ट्राच्या सर्व भागांतील निवडक शिक्षक व शिक्षणतज्ज्ञ यांच्याकडून पुस्तकाचे समीक्षण करण्यात आले. त्यांच्याकडून आलेले अभिप्राय व सूचना यांचा सांगोपांग विचार करून पुस्तकाला अंतिम रूप देण्यात आले आहे.

मंडळाची मराठी भाषा समिती व चित्रकार यांच्या आस्थापूर्वक परिश्रमांतून हे पुस्तक तयार झाले आहे. मराठी भाषा समितीला हे पुस्तक तयार करताना निमंत्रित सदस्य श्री. व. द. देसाई यांचे बहुमोल सहकार्य लाभले. या सर्वांचे मंडळ मन:पूर्वक आभारी आहे.

या पाठ्यपुस्तकाचे अध्ययन व अध्यापन दर्जेदार व्हावे, यासाठी मंडळाने सदर पाठ्यपुस्तकाची अध्यापन पुस्तिकाही प्रकाशित केली आहे. अध्यापन उद्दिष्टाधिष्ठित होण्यासाठी शिक्षकांनी सदर पुस्तिकेचा अवश्य उपयोग करून घ्यावा.

विद्यार्थी, पालक व शिक्षक या पुस्तकाचे स्वागत करतील, अशी आशा वाटते.

सि. आ. देवकर

संचालक,
महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व
अभ्यासक्रम संशोधन मंडळ, पुणे.

पुणे,
दिनांक : १५ ऑगस्ट, १९९४
श्रावण २४, शके १९१६

# अनुक्रमणिका

## गद्य-विभाग

## पद्य-विभाग



### ऋणनिर्देश


खालील प्रकाशक/हक्कदारांनी आपले पाठ पुस्तकात समाविष्ट करण्यासाठी परवानगी दिली, त्याबद्दल आम्ही त्यांचे ऋणी आहोत.

| | पाठांचे नाव | संदर्भ/प्रकाशक |
|---|---|---|
| १. | निसर्गः आपला मित्र | द फॉल ऑफ ए स्पॅरो - ऑक्सफर्ड युनिव्हर्सिटी, दिल्ली |
| २. | मित्र | गुजगोष्टी - व्हीनस प्रकाशन, पुणे. |
| ३. | मानवता | पेर्ते व्हा - व्हीनस प्रकाशन, पुणे. |



# १. पाखऱ्या

**रंगराव बापू पाटील** (जन्म १९३९) ग्रामीण कथा व कादंबरी लेखक. ग्रामीण जीवनाचे वास्तव दर्शन हे त्यांच्या लेखनाचे वैशिष्ट्य. 'ल्हावर', 'रानकोंबडी', 'मुराळी', 'भोवरा' इत्यादी कथासंग्रह; 'बोरबन', 'दंश', 'वस्ताद' या त्यांच्या कादंबऱ्या प्रकाशित.

आपल्या कृषिप्रधान देशात बैलाला विशेष महत्त्व आहे. 'पाखऱ्या' या पाठात पाखऱ्या हा बैल वृद्ध झाला तरी तो शेवटपर्यंत आपल्याजवळच राहिला पाहिजे ही मुक्या प्राण्यांबद्दलची प्रेमभावना परिणामकारकपणे लेखकाने विशद केली आहे.

आबांनी आपल्या बैलाचे नाव पाखऱ्या ठेवले होते. तो घरच्या गाईचा खोंड होता. तो उंच होता आणि लांबही होता. शिंगे टोकदार होती. वशिंड ऐटदार होते. शेपटाचा गोंडा काळाभोर होता. त्याच्या एकाच डिरकीने कृष्णाकाठ दुमदुमून जाई.

आबांनी त्याला झुंज खेळायला शिकवले होते. पहाटे ते त्याला पळवून आणत. मग त्याला भरडा चारत असत. कधी कणकीचे गोळे तर कधी तुपात भिजवलेले रोट चारत. बेंदूर सणाला तेलातून अंडी पाजत असत. रानातून हिरवेगार आणि कोवळे लुसलुशीत गवत आणून घालत. मक्याची कोवळी कणसे पाखऱ्या फार आवडीने खाई. आबांना पाखऱ्याशिवाय दुसरे काही सुचत नसे. ते त्याला जिवापाड जपत.

पाखऱ्याने प्रत्येक ठिकाणी झुंज जिंकून आबांना बक्कळ पैसा दिला होता. त्या पैशांतून आबांनी मळा विकत घेतला होता. आबा श्रीमंत झाले होते. घरची परिस्थिती चांगली झाली होती. आबांनी टोलेजंग वाडा बांधला होता. आता अनेक दुभती जनावरे दावणीला होती.

'आबांचा पाखऱ्या' या नावाने साऱ्या पंचक्रोशीत तो खोंड प्रसिद्ध होता. कृष्णा-वारणेच्या संगमावर वसलेले हरिपूर गाव पाखऱ्यामुळेच प्रसिद्धीस आले होते. त्याची झुंज पाहण्यास खूप दूरवरून माणसे येत. ती पाहताना त्यांची मने आनंदाने फुलून येत. त्याला मैदानात झुंज खेळताना पाहून लोकांत उत्साहाचे भरते येई.

एकदा गुढे गावच्या प्रसिद्ध बैलाबरोबर पाखऱ्याची झुंज होती. आमच्या पंचक्रोशीत गुढे गाव त्या बैलामुळेच प्रसिद्ध पावले होते. तो बैल डोंगर-कपारीच्या चाऱ्याने तुस्त झालेला, तर पाखऱ्या कृष्णाकाठच्या खुराकाने मस्त झालेला. कऱ्हाडच्या मैदानात ही झुंज पाहण्यासाठी माणसेच माणसे भरली होती. झुंज सुरू झाली. दोन्ही बैलांनी डिरक्या टाकल्या. खुरांनी माती उडवली आणि क्षणार्धात झुंज सुरू झाली. माणसे मुठीत जीव घेऊन झुंज पाहू लागली. धुरळा उडाला. झुंज चांगली तासभर चालली. कोणताच बैल हटेना. अखेर पाखऱ्याने एक जोराची धडक दिली आणि गुढे गावच्या बैलाला पळवून लावले. झुंज पाखऱ्याने जिंकली आणि जोराची डिरकी टाकली. त्याच वेळी सबंध मैदानात माणसांनी जल्लोष केला. कुणी फेटे उडवले. कुणी गुलाल उडवला.

आबा धावत आपल्या लाडक्या पाखऱ्याकडे गेले. त्याच्या पाठीवर थाप टाकली. त्याला मैदानातून बाजूला नेले. पाखऱ्याने मिळवलेले बक्षीस स्वीकारताना आबांचे अंतःकरण आनंदाने फुलून आले.

मग त्यांनी पाखऱ्याला गावाकडे आणले. रात्री त्याची जंगी मिरवणूक निघाली. बँड, हलगी-लेझीम, ढोल इत्यादी सर्व ताफे हजर झाले. गावातील तरणी पोरे दांडपट्टाही खेळू लागली. असे अनेक प्रसंग घडले.

आता पाखऱ्या म्हातारा झाला होता. झुंज खेळणे त्याला जमत नव्हते. सरकारने झुंज खेळवणे कायद्याने बंद केले होते. जनावरांची अशी लढत लावणे व ती पाहत बसणे हे अमानुष आहे, असे सरकारने म्हटले होते. पाखऱ्याला रानातही नेत नसत व गाडीलाही जुंपत नसत. नांगराला तर त्याला कधीच जुंपला नव्हता, कारण तो झुंज खेळणारा खोंड होता.

एके दिवशी आबा रानातून आले. सायंकाळ झाली होती. वाड्यातल्या सोप्यात त्यांचा थोरला मुलगा जयसिंगराव बसला होता. चाकरीचे गडीही तिथेच बसले होते. आबा येताच त्यांचे बोलणे थांबले. आबांनी विचारले,

''कायरं ? असं का गप झालाय ? काय बेत हाय ?''

''कायं न्हाय,'' एक गडी हळूच बोलला.

''काय जयसिंगराव, काय चाललंय ?''

जयसिंगरावाने इकडे तिकडे पाहिले आणि मग धाडसाने म्हटले, ''पाखऱ्याला इकायचं म्हणतुया.''

"डोकं फिरलं काय तुझं ?" आबा संतापून म्हणाले.

सर्वजण गप्प झाले; पण तोच आबांनी पुन्हा विचारले,

"का ? कशासाठी विकायचा ?"

"त्यो झुंज खेळणारा बैल हाय. रानातल्या कामाला उपयोगी पडत न्हाय. आता त्यो म्हातारा झाला आणि त्याला खुराक चारण्याचा खर्च पण जास्त येतुया. इकून पैकाबी चांगला यील..." जयसिंगरावाने सगळे एकदमच सांगून टाकले.

"तुमाला काय करायचं ते करा जावा. तुमी कारभारी हाय आता," असे आबा तावातावाने बोलले आणि सोप्यातून घरात गेले.

त्या दिवशी आबांना रात्रभर झोप लागली नाही. पाखऱ्याचाच विचार त्यांच्या डोक्यात सारखा घोळत होता. काय करावे तेही त्यांना सुचत नव्हते. गतकाळ त्यांना आठवू लागला. पाखऱ्याने झुंज जिंकताच बेहोष होऊन नाचणारी, रंगीबेरंगी फेटे उडवणारी माणसे त्यांना दिसू लागली. हे सर्व काही आठवून आबा रात्रभर तळमळत होते.

जयसिंगराव सकाळी लवकर उठला. त्याने पाखऱ्याला नदीतून धुऊन आणला. शिंगे घोळून टोकदार केली. गळ्यात गुलाबी रंगाचा कंडा घातला. एका पायात काळा गोफ बांधला. अंगावर सुंदर नक्षीची झूलही घातली.

सर्व तयारी झाली. आबा अस्वस्थ मनाने सोप्यातून फेऱ्या मारत होते. मग गड्यांनी पाखऱ्याची दावी सोडली. मालकीणबाईंनी पाखऱ्याच्या तोंडात भाकरी दिली. आबांनी त्याला गोंजारताच तो आबांचे हात चाटू लागला.

"हं जा बाबा, तुझा इथला घास संपला आता," आबा आवंढा गिळत बोलले.

"काय आबा ? कुणाचा घास संपला आता ?" असे विचारत आबांचे एक जिवलग स्नेही, तात्या वाड्यात आले. आबा काहीच बोलले नाहीत.

"काय गडबड आहे जयसिंगराव ?" तात्यांनी विचारले.

"विकायला घेऊन निघालोय पाखऱ्याला."

"विकायला ?"

"होय तात्या."

"कारं बाबा ?"

"आता तो म्हातारा झालाय. शेतीची कामंही त्याला जमत न्हाईत."

"म्हणून विकता ?" तात्यांनी आपला आवाज चढवून विचारले.

''होय, आणि झुंज खेळलेला बैल म्हणून त्याला खानाही लई लागतुया. तोही खर्च इनाकारणी.''

यावर तात्या गप्प झाले व सर्वांच्याकडे पाहत राहिले. सोप्यात आबाही सर्वांच्याकडे पाहत शांत उभे होते. थोडा वेळ कुणीच काही बोलले नाही.

मग तात्या जोत्याच्या पायऱ्या चढून सोप्यात जात म्हणाले, ''जयसिंगराव, जरा इकडं या.''

जयसिंगरावही जोते चढून सावकाश सोप्यात गेला.

''बसा, खाली बसा.''

''काय तात्या ?''

''असं खाली बसा. मग सांगतो.''

जयसिंगराव तात्यांच्या जवळ बसला. आबा पाठीशी हात बांधून उगीच कुठेतरी पाहत उभे राहिले होते. चाकरीचे गडी पाखऱ्याची दावी धरून तसेच उभे होते. मालकीणबाई चौकटीत उभ्या राहून सर्वांच्याकडे शांतपणे पाहत उभ्या होत्या.



"जयसिंगराव, पाखऱ्याची किंमत किती ?"

"का बरं ?"

"किंमत बोला अगोदर," तात्या गंभीरपणे म्हणाले.

"पाच हजार रुपये..."

"पाखऱ्याला मी घेतोय..."

"तुमी ?"

"होय. आणि आबांनाही आमच्याकडे पाठवा. ते आमच्याकडेच राहतील."

"का बरं ?"

"ते पण आता म्हातारे झालेत. त्यांनाही आता शेतीची कामे जमत नसतील. म्हाताऱ्याला खानाही चांगला द्यावा लागतो. तो विनाकारण खर्च."

हे ऐकताच जयसिंगरावाच्या डोक्यात चक्क प्रकाश पडला. त्याने तिथूनच गड्यांना सांगितले,

"आरं, पाखऱ्याला दावणीला बांधा. तो आपल्या दावणीला कायम ऱ्हाईल. तात्या मला समदं कळलं."



जयसिंगरावाने तात्यांचे पाय धरले. आबांना नमस्कार केला. सगळ्यांच्या आनंदाला पारावार उरला नाही.

**प्रश्न :**

खालील प्रश्नांची प्रत्येकी चार-पाच वाक्यांत उत्तरे लिहा.

१. आबा पाखऱ्याची निगा कशी राखत ?

२. झुंज जिंकल्यानंतर आबांनी पाखऱ्याचे कौतुक कसे केले ?

३. जयसिंगरावाने पाखऱ्याला विकायचा निर्णय का घेतला ?

४. जयसिंगरावाने तात्यांचे पाय का धरले ?

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. खालील शब्दसमूहांचा अर्थ सांगून वाक्यात उपयोग करा.
जिवापाड जपणे, जल्लोष करणे, डोके फिरणे, आवंढा गिळणे.

२. तुम्ही पाहिलेल्या बैलगाडीच्या शर्यतीचे वर्णन लिहा.

३. बैलांप्रमाणे मानवाला उपयोगी पडणारे अनेक प्राणी आहेत. तुमच्या परिसरातील अशा प्राण्यांची माहिती मिळवा.

४. तुमच्या घरातील प्राण्यांच्या सवयी माहीत करून घ्या व सांगा.

**व्याकरण :** उजळणी

पुढील प्रश्नांची उत्तरे द्या.

१. वर्ण म्हणजे काय ? २. मराठीतील स्वर कोणते ?

**विभक्तीचे अर्थ**

झुंज पाखऱ्याने जिंकली.

वरील वाक्यात 'जिंकली' या क्रियापदाशी 'पाखऱ्याने' व 'झुंज' या दोन नामांचा प्रत्यक्ष संबंध आहे. जिंकणारा कोण ? तर 'पाखऱ्या'. जिंकण्याची क्रिया करणारा म्हणून तो **कर्ता.** जिंकण्याची क्रिया कोणावर घडते ? तर 'झुंज' या शब्दावर. म्हणून 'झुंज' हे त्याचे **कर्म.** या वाक्यात 'पाखऱ्याने' व 'झुंज' यांची कारक विभक्ती आहे. कारण त्याचा संबंध क्रियापदाशी आहे. कर्ता व कर्म या कारक विभक्ती होत.

वाक्यात नामाचा व सर्वनामाचा मुख्य क्रियापदाशी जो संबंध असतो त्याला **कारकार्थ** वा **कारक संबंध** व त्या विभक्तीला **कारक विभक्ती** असे म्हणतात.

**अभ्यास :**

खालील वाक्यांतील कारक संबंध व कारक विभक्ती ओळखा.

१. आबांनी टोलेजंग वाडा बांधला.

२. गड्याने पाखऱ्याचे दावे सोडले.



# २. चोरी झालीच नाही

**जयवंत दळवी** (जयवंत द्वारकानाथ दळवी : १९२५-१९९४) मराठीतील प्रसिद्ध साहित्यिक. कथा, कादंबरी, नाटक या वाङ्मयप्रकारांत विपुल लेखन केले आहे. 'ललित' मासिकात वीस वर्षे 'ठणठणपाळ' नावाने लेखन. 'आश्रम', 'गहिवर', 'स्पर्श', 'स्त्रीपर्व' हे कथासंग्रह; 'संध्याछाया', 'सूर्यास्त', 'महासागर', 'पर्याय', 'पुरुष' ही नाटके; 'चक्र', 'महानंदा', 'सारे प्रवासी घडीचे' या कादंबऱ्या व इतर विनोदी पुस्तके प्रसिद्ध.

सिनेमाला गेलेल्या शास्त्री कुटुंबाच्या घरी चोरी होते. चोरीत शास्त्रींचे फक्त 'नकली दागिने' गेलेले असतात. नकली दागिने चोरणारा तरुण नकली इन्स्पेक्टर बनून सगळ्यांची फिरकी घेतो आणि शास्त्री 'चोरी झालीच नाही' असे सांगू लागतात हे या पाठात मनोरंजक पद्धतीने सांगितले आहे.

(पडदा वर जाताच खोलीचा दरवाजा उघडून शास्त्रीबुवा आणि बाई आत येतात नि गडबडीने दिवा लावतात. खोलीतील अस्ताव्यस्त पडलेली मालमत्ता पाहून दबलेल्या आवाजात किंचाळण्याचा प्रयत्न करतात.)

**बाई** : वाटलंच! नाही तर म्हटलं कुलूप उघडं कसं ?

**शास्त्री** : तरी मी सतरांदा सांगितलं, दोनदोनदा कुलूप ओढून पाहा म्हणून! पण तुला सांगितलं तरी ओढून पाहायला नको ?

**बाई** : चारदा ओढलं कुलूप; पण बंद कुलूप फोडलं त्याला कोण काय करणार ?

**शास्त्री** : (कपाळावर हात मारत) आता कुलूप मरू दे! चोरांनी काय काय पळवलं ते बघ आधी. (पाऊल पुढे टाकताच एका बोचक्याला अडकून शास्त्रीबुवा खाली पडतात. पडताच 'चोर-चोर' म्हणून किंचाळतात.)

**बाई** : (एकदम दचकून) कुठाय चोर ?

**शास्त्री** : (शरमून उठतात.) नाही बोचकंच आहे. मला वाटलं चोरच लपलाय.

बाई : तुमचा आपला मुलखावेगळा भित्रेपणा! मी घाबरले नाही आणि तुम्ही घाबरून ओरडताय? (तेवढ्यात फळीवरला ग्लास गडगडत बाईच्या डोक्यावर पडतो. बाई 'चोर-चोर' म्हणत या कोपऱ्यातून त्या कोपऱ्याकडे पळतात.)

शास्त्री : (आधी दचकतात, पण ग्लास पडलेला पाहून चिडतात.) अशी ओरडतेस काय पोरासारखी? तो बघ उंदीर पळाला. उंदराने ग्लास पाडला तर घाबरायला कशाला पाहिजे? आणि चोर असला म्हणून काय करणार आहे—मी इथं असताना?

बाई : (अजून छाती धडधडतेच आहे.) छे! कलकलणी सुरू झाली. आता काय आहे नि काय गेलं हेसुद्‌धा कळायचं नाही.

शास्त्री : कपाट बघ उघडून आधी.

बाई : उघडून कशाला? उघडंच आहे.

शास्त्री : (स्वतः कॉटखाली पाहत) काही गेलं का पाहा!

बाई : अग्गबाई, दागिने गेले!

शास्त्री : (एकदम उठत) गेले? हरे राम. (खाली बसतात.)



बाई : तुमचं हे असंच! सिनेमाला जाताना दागिने घालते म्हटलं तर म्हणालात रात्र आहे, काढून ठेव. आता काय करायचं ?

शास्त्री : (हषनि उठतात.) म्हणजे कपाटातले गेले.

बाई : मग आणखी कुठले ?

शास्त्री : कपाटातले गेले तर जाऊ देत. नाही तरी ते बनावट गिलिटाचेच होते. नेऊ देत. चोरच फसतील.

(शास्त्रीबुवा आत जातात. तेवढ्यात फोटोमागच्या कुलूपबंद फडताळातल्या नोटा काढून बाई मोजण्यात दंग होतात.)

बाई : (आनंदी होऊन) दागिने व या नोटा होत्या तशाच आहेत. माझ्या वडिलांच्या फोटोमागे लपवल्या म्हणून राहिल्या हो! माझ्या वडिलांचा चेहरा केवढा करारी!

शास्त्री : (संतापून) होय होय! तुझ्या वडिलांच्या चेहऱ्याचं नंतर बघू! आधी काय काय गेलं ते बघा.

बाई : काही गेलंच नाही.

शास्त्री : बनावट दागिने तेवढे गेले.





बाई : घ्या मेल्यांनो म्हणावं, खा ते नकली गिलिटाचे दागिने. पंचवीस रुपयेसुद्धा येणार नाहीत.

शास्त्री : उलटं ते विकायला गेले तर पकडले जातील, पण तुला आता तरी पटलं ना? मी बनावट दागिने तुला का आणून दिले ते? तू म्हणत होतीस मी कद्रू म्हणून असले दागिने आणले, पण माझी हुशारी आली ध्यानी की नाही?

बाई : पण मी खरे सोन्याचे दागिने घालायला काढले नाहीत, ही माझी हुशारी नव्हे?

शास्त्री : पुरे पुरे तुझी हुशारी! आधी काय काय गेलं त्याची यादी करू.

बाई : पण काही गेलंच नाही तर यादी कशाची?

(मधू टॉर्चचा झोत टाकत येतो. तेवढ्यात बाई खिडक्या उघडतात.)

मधू : काय झालं? काय गडबड?

शास्त्री : (दबलेल्या आवाजात) चोरी झाली चोरी!

मधू : (दचकून) चोरी? (एकदम केकाटतो.) चोर-चोर- (शेजारचे अण्णा व गंगाबाई गडबडून धावत येतात.)

अण्णा : (घाबरून) काय गडबड आहे, शास्त्रीबुवा?

मधू : चोरी-चोर-चोर-चोर—

(अण्णा आणि गंगाबाई पळू लागतात.)

शास्त्री : पळू नका अण्णा! चोर पळालेत.

(अण्णा परत येऊन दरवाजापाशी उभे राहतात. गंगाबाई खिडकीकडेच उभ्या राहतात.)

अण्णा : चोर गेले ना? तेच म्हटलं, तुम्ही तर थंड आहात!

शास्त्री : तुम्हांला काय वाटलं? चोराशी वाटाघाटी करतोय म्हणून?

अण्णा : (वेध घेत) पण ही चोरी झाली कशी?

शास्त्री : (वैतागून) चोर आले नि चोरी करून गेले.

अण्णा : (पटल्यामुळे) हो! तेही शक्य आहे! पण माल कितीचा गेला?

शास्त्री : आठ-दहा हजारांचा गेला.

गंगा : आठ-दहा हजार? अग्गोबाई, म्हणजे बरंच सेव्हिंग होतं की हो! बाई तर नेहमी म्हणायच्या की पैसाच राहत नाही म्हणून!
बाई : रोकड नव्हती गंगाबाई! दागिने गेले.
शास्त्री : आणि चांदीची भांडी गेली.
अण्णा : चांदीचीच गेली का? पाहा एकदा-
गंगा : हो! स्टेनलेस स्टीलची गेली असतील.
शास्त्री : स्टेनलेस स्टील नि चांदी का कळत नाही आम्हांला, अण्णा?
अण्णा : आठ-दहा हजारांचा माल म्हणजे मोठीच चोरी झाली!
शास्त्री : मग आम्ही म्हणतोय काय?
अण्णा : (पुनः तेच!) म्हणजे बरंच सेव्हिंग होतं हो!
शास्त्री : (चिडून) सेव्हिंग नाही. दागिने नि भांडी गेली, अण्णा!
अण्णा : पण सेव्हिंगशिवाय दागिने नि भांडी कुठून येणार? सेव्हिंग हे असं हवं! वाः वाः! शास्त्रीबुवा, सेव्हिंग असावं तर असं!
शास्त्री : (वैतागून) अरे, पण काय हे? वेळ कोणती, तुमची चर्चा कोणती? अण्णा, अहो इथं चोरी झालीय.

(या गरम चर्चेमुळे जोशी, चोपडे वगैरे मंडळी जमा होतात.)

अण्णा : मीही तेच म्हणतोय - ही चोरी झाली कशी?
जोशी : (डोळे चोळत आत येतात.) चोरी झाली? म्हणता काय?
अण्णा : चोरी झाली.
जोशी : तेच म्हणतो - चोरी झाली कशी?
शास्त्री : (वैतागाने कपाळावर हात मारतात.) नशीब माझं!
जोशी : नशीबच म्हटलं पाहिजे. नाहीतर दिवसाढवळ्या चोरी?
अण्णा : स्वप्नात का आहात, जोशीबुवा? दिवसाढवळ्या? मध्यरात्र आहे, मध्यरात्र!
जोशी : (गोंधळून) वाजले किती?
शास्त्री : (कपाळावर हात घेत खाली बसतात.) अरेरे! घड्याळही गेले!
बाई : अग्गबाई, घड्याळ पण गेले!
चोपडे मास्तर : (गर्दीतून) पण शास्त्रीबुवांकडे घड्याळ होतं कधी?

जोशी : तोच विचार करतोय मी .

अण्णा : रोज टाईम तर विचारता आम्हांला ?

गंगा : आणि तेही अर्ध्या अर्ध्या तासाने.

बाई : घड्याळ लावायचं झालं तर टाईम विचारायला नको ?

चोपडे : पण तुमच्याकडे घड्याळ नव्हतंच हो शास्त्रीबुवा !

शास्त्री : (संतापून) मधू,या वायफळ चर्चा नकोत. तू पोलीस ठाण्यावर जाऊन वर्दी दे ! (मधू जातो.)

जोशी : (डोके खाजवत) आश्चर्यच आहे. ही चोरी झाली कशी ? तुम्ही काय करत होता ?

शास्त्री : सांगतोय काय ? आम्ही तिघे सिनेमाला गेलो होतो.

चोपडे : पाहिलंत ? मोफतचा पास मिळाला म्हणून रात्रीचे सिनेमाला जाऊ नये ते एवढ्याकरता !

शास्त्री : ठेवलाय मोफतचा पास ! चक्क सव्वा रुपयाची तिकिटं काढली होती !

चोपडे : नाही.... मधू म्हणत होता पास मिळालाय म्हणून !

शास्त्री : मधूला नाही अक्कल !

चोपडे : मुलाला असं बोलू नये ! म्हणजे मग मुलांची वाढ होत नाही. मुलांची मनं कोमेजतात. मुलं म्हणजे फुलंच ना ?

शास्त्री : चोपडे मास्तर, पुरे हं तुमची अक्कल ! ते ज्ञान शाळेत ठेवा.

बाई : आधी बी. टी. व्हा म्हणावं. तिथं दोनदा नापास —

चोपडे : बाईसाहेब, फक्त एका विषयात नापास, बाकी विषयांत फर्स्ट क्लास आहे.

शास्त्री : अहो, पण काय हे ? वेळ कोणती नि चर्चा कोणती ? चोपडे मास्तर, इथं चोरी झालीय चोरी.

जोशी : मी तेच म्हणतोय ! अण्णा एवढ्या शेजारी असून चोरी झाली कशी ?

अण्णा : मीही तेच म्हणतोय. मी शेजारच्याच खोलीत झोपलेला आणि चोरी झाली कशी ?

बाई : वेळ आली म्हणजे शेजाऱ्यापाजाऱ्यांचा काही उपयोग नाही.

गंगा : (फणकारून) शेजारी राहतो म्हणजे काय तुमच्या दारावर बसून राहायचं की काय ?

चोपडे : (झटक्याने) एक विचार आला —

(सगळेजण चोपडे मास्तरांच्या तोंडाकडे पाहतात.)

शास्त्री : अहो, बोला तरी!

चोपडे : कुठला असेल ?

शास्त्री : ते शाळेतल्या पोरांना विचारा.

चोपडे : ज्यानं तुम्हांला सिनेमाचा पास दिला, त्यानंच नाही ना चोरी केली ?

जोशी : शक्य आहे. नाहीतर नेमक्या याच वेळी तुम्ही घरी नाही हे अनोळख्या चोराला कळलं कसं ?

शास्त्री : (विचार करत) शक्य आहे, असेल, असेल!

बाई : तरी मी म्हणत होते, की त्या करंदीकरांचा पास नको म्हणून!

(सगळे हसतात.)

(तेवढ्यात एक तरुण रुबाबात येतो.)

तरुण : मी सी. आय. डी. इन्स्पेक्टर. चोरी इथं झाली ?



| | | |
|---|---|---|
| शास्त्री | : | होय साहेब! ही पाहा—इथंच चोरी झाली! |
| तरुण | : | कशी झाली? |
| शास्त्री | : | साहेब, नशीब आपलं! दुसरं काय? |
| तरुण | : | चोरीत काय काय गेलं? |
| बाई | : | दागिने गेले, चांदीची भांडी गेली. |
| शास्त्री | : | घड्याळ गेलं— |
| चोपडे | : | पण घड्याळ तर नव्हतंच यांच्याकडे— |
| शास्त्री | : | कुणी सांगितलं नव्हतं म्हणून? होतं हो साहेब! |
| बाई | : | रेडिओ गेला! |
| अण्णा | : | रेडिओ? यांच्याकडे रेडिओ होता कधी? |
| बाई | : | होता आमच्याकडे रेडिओ— |
| जोशी | : | कधी आवाज नाही बुवा ऐकला! |
| बाई | : | तुमच्या घरातल्या भांडणापुढे रेडिओ कुठला ऐकणार? |
| चोपडे | : | आम्हीसुद्धा ऐकला नाही. |
| तरुण | : | तुम्ही करता काय? |
| चोपडे | : | मास्तर आहे साहेब! |
| बाई | : | नसता मेला चोंबडेपणा— |
| तरुण | : | कुणाचा? |
| बाई | : | या चोपडे मास्तरांचा! |
| चोपडे | : | (चिडून) नव्हताच मुळी तुमचा रेडिओ! साहेब, मी साक्ष दयायला तयार आहे. यांच्यापाशी रेडिओच नव्हता. |
| बाई | : | आणि रेडिओ होता हे सिद्ध केलं तर? |
| शास्त्री | : | कसं सिद्ध करणार? चोरीला गेलाय ना? |
| जोशी | : | कसला रेडिओ होता? कुठल्या कंपनीचा? |
| बाई | : | सिलोन रेडिओ. |
| | | (सगळे हसतात.) |
| शास्त्री | : | हसायला काय झालं? सिलोन रेडिओ नसतो? |
| तरुण | : | बरं, आणखी काय गेलं? |

शास्त्री : अहो, कितीतरी गेलंय, पण आताच कसं सगळं सांगू ?

तरुण : तुमच्या शेजारी कोण राहतात ?

शास्त्री : हे अण्णा राहतात!

बाई : पण शेजाऱ्यांचा काही उपयोग नाही मेला.

तरुण : कोण अण्णा ?

अण्णा : (गरीब होऊन) मी साहेब! इन्कमटॅक्समध्ये असतो. गव्हर्नमेंट सर्वंट!

तरुण : चोर आले होते, तेव्हा तुम्ही काय करत होता ?

अण्णा : झोपलो होतो साहेब!

तरुण : तुम्ही झोपला होता, मग त्या वेळी चोर आले होते, हे तुम्हांला कसं कळलं ?

अण्णा : कळलं नाही, पण आम्ही जागे असताना चोर आले नाहीत एवढं खरं. आम्ही झोपलो होतो.

तरुण : आम्ही म्हणजे आणखी कोण ?

अण्णा : माझी बायको.

तरुण : त्या वेळी त्या काय करत होत्या ?

अण्णा : त्याही झोपल्या होत्या.

तरुण : (विचार करत) पण हे झोपले असताना चोर आले कसे ?

जोशी : अण्णांची झोप भयंकर आहे साहेब. ते एकदा झोपले म्हणजे खुद्द त्यांना चोरून नेलं तरी त्यांना कळणार नाही.

तरुण : मी प्रश्न तुम्हांला विचारला ?

जोशी : चुकलो साहेब! (गाल फोडत मागे सरकतात व गप्प उभे राहतात.)

तरुण : अण्णा, झोपलात म्हणजे तुम्ही घोरता ?

अण्णा : (दीन होऊन) होय साहेब! थोडासा!

चोपडे : थोडासा कशाला ? चाळ दणदणते यांच्या घोरण्यानं. इतरांना झोप नाही येत.

तरुण : तुम्हांला मी विचारलं ?

चोपडे : चुकलो. माफ करा साहेब!

शास्त्री : ही सवयच आहे चोपडे मास्तरांची.

तरुण : अण्णा, तुमच्या या घोरण्यामुळे चोरी झाली. समजलं ?

अण्णा : होय साहेब.

तरुण : तुमच्या घोरण्यामुळे निश्चितपणे चोरांना कळलं की तुम्ही झोपला आहात.

जोशी : एवढंसुद्धा आमच्या लक्षात आलं नाही.

(तरुण रोखून पाहतो. जोशीबुवा जीभ चावून गप्प राहतात.)

अण्णा : काय करू साहेब, ही जुनी सवय आहे.

तरुण : सवय मोडावी! एका साध्या सवयीमुळे भयंकर चोरी झाली. काय झाली ?

अण्णा : (हात चोळत) चोरी झाली.

गंगा : त्यांनी डॉक्टर केले, वैद्य केले, पण सवय जात नाही.

अण्णा : डॉक्टर म्हणतात इलाज नाही. डॉक्टर म्हणतात झोपेत तोंड उघडं राहतं आणि मग गळ्यातून आवाज होतो.

तरुण : मग झोपेत तोंड उघडं ठेवू नये.

अण्णा : ते राहतं हो साहेब!

तरुण : तोंड उघडं राहिलं तर जागं व्हावं, तोंड मिटावं आणि पुन्हा झोपावं, काय ?

अण्णा : होय साहेब.

जोशी : बरं झालं एकदाचं. म्हणजे चोरीच्या निमित्ताने यांच्या घोरण्याचा त्रास तरी टळला.

तरुण : (खिशातून दागिने काढतो.) हे दागिने तुमचे ?

बाई : हो, हो आमचेच.

शास्त्री : (दचकून) चोर सापडला ?

तरुण : तुम्ही दचकलात का ?

शास्त्री : छे, दचकलो नाही.

तरुण : हे दागिने तुमचे ?

शास्त्री : हो, आमचेच.

तरुण : किती तोळ्याचे आहेत ?
शास्त्री : काय ग ? किती तोळ्याचे असतील ?
बाई : मला काय माहीत ? तुम्हीच तर आणले होते.
शास्त्री : मला वाटतं आठ-दहा तोळ्यांचे असतील.
तरुण : असतील ?
बाई ': पंधरा तोळ्यांचे असावेत.
तरुण : हे सोन्याचे आहेत.?
शास्त्री : हो-हो शंभर नंबरी.
तरुण : हे नकली—गिलिट चढवलेले दागिने नाहीत ?
शास्त्री : नसावेत. (कचरतात.)
तरुण : नसावेत ?
शास्त्री : असतीलही. (सगळे हसतात.)
तरुण : हे नकली दागिने आहेत काय ?
शास्त्री : हो-हो आहेत.
तरुण : मग सोन्याचे कसे म्हणालात ?
शास्त्री : (गरीब होऊन) चुकलो साहेब.
तरुण : चुकलात कसे ?
शास्त्री : चुकून-चुकलो साहेब. (सगळे हसतात.)
तरुण : तुमचा सिलोन रेडिओ गेला ?
शास्त्री : होय साहेब !
तरुण : तुमचं घड्याळ गेलं ?
शास्त्री : होय साहेब !
तरुण : तुमची चांदीची भांडी गेली ?
शास्त्री : होय साहेब !
तरुण : हे सारं खरं आहे ?
शास्त्री : (बाईस...) काय ग ? खरं ना ?
बाई : मला काय माहीत ?
शास्त्री : मग कुणाला माहीत ?

तरुण : मला माहीत आहे. त्या नकली दागिन्यांशिवाय तुमचं काहीही गेलेलं नाही.

शास्त्री : (घाबरून) कशावरून ? चोर सापडला ?

तरुण : होय !

शास्त्री : कुठं आहे भामटा ? आणा त्याला इथं. फाडून खातो.

तरुण : मीच तो चोर.

जोशी : (एकदम घाबरून) चोर-चोर-चोर !

तरुण : कोण ओरडलं ?

जोशी : (घाबरून) कुणी नाही. चुकून ओरडलो.

(बाकीचे पळायचा प्रयत्न करतात, पण ते खोलीत आहेत आणि चोर दरवाजावर आहे.)

तरुण : कोणीही हालायचं नाही. मुडदे पाडीन ! हे घ्या तुमचे खोटे दागिने. म्हणजे आता चोरीत तुमचं काहीच गेलेलं नाही. पोलीस आले तर त्यांना सांगा— चोरी झालीच नाही.

शास्त्री : होय साहेब.

तरुण : आणि चोरी झाली असं पोलिसांना कळलं तर माहीत आहे काय होईल ?

शास्त्री : (गोंधळून) होय साहेब.

तरुण : काय होईल ?

शास्त्री : चोपडे मास्तर, उत्तर द्या ना !

चोपडे : मला पोरांना प्रश्न विचारण्याची सवय आहे. उत्तर कसं देऊ ?

तरुण : मुडदे पडतील !

जोशी : (एकदम घाबरत) मुडदे ?

शास्त्री : होय साहेब ! आम्ही नाही सांगणार पोलिसांना.

तरुण : मी जातो. आरडाओरडा कराल तर याद राखा.

(चोर जातो तसे शास्त्रीबुवा आणि बाई हतबल होऊन खाटेवर बसतात. क्षण दोन क्षण कुणीच काही बोलत नाहीत. फार तर घाम पुसण्याचा प्रयत्न होतो. मग एकमेकांची तोंडं निरखण्याचा गुळचट प्रयत्न, तोच मधू व पोलीस इन्स्पेक्टर येतात.)

बाई : आलास मधू ? ये बाबा ये! तुझीच काळजी होती मला.

इन्स्पेक्टर : कुठं झाली चोरी ? कशी झाली ?

शास्त्री : चोरी ? कुठं ? छे-छे...... चोरी झालीच नाही.

इन्स्पेक्टर : गडबड काय आहे ?

शास्त्री : त्याला स्वप्न पडलं असणार साहेब !

इन्स्पेक्टर : मग तुम्ही का जमलात ?

शास्त्री : हा मधू झोपलेला उठून गेला. कुठून गेला, कसा गेला, कुठे गेला याचा विचार करत होतो.

इन्स्पेक्टर : (हसतो.) अस्सं-अस्सं, जातो तर मी!

शास्त्री : माफ करा साहेब. तुम्हांला तसदी दिली.

बाई : तुम्ही बरोबर होता म्हणून पोर हाती लागला.



इन्स्पेक्टर : दॅट्स ऑल राइट! पण यापुढे काळजी घ्या. आतून कुलूप घाला.

शास्त्री : हो हो, माफ करा साहेब, माफ करा.

(इन्स्पेक्टर जातो.)

मधू : (एकदम भडकतो) असं काय करताय बाबा तुम्ही?

शास्त्री : अरे तू झोपेतून उठून गेलास!

मधू : असं काय करता? आपण सिनेमाला नव्हतो का गेलो?

शास्त्री : छे रे मधू! ते सारं स्वप्न!

चोपडे : पासावर सिनेमाला गेला होता ना?

मधू : हो! सांगा यांना —

चोपडे : करंदीकरांनी पास दिला होता ना?

मधू : हो!

चोपडे : मग बरोबर! स्वप्नच ते! (सगळे हसतात.)

मधू : (भयंकर चिडतो) खोटं आहे! ते स्वप्न नव्हतं. इथं खरी चोरी झाली होती. मी झोपलो नव्हतो. मी जागा होतो. मी जागा होतो.

शास्त्री : ओरडू नको! ओरडू नको.

(सगळे मधूला धरतात व उचलून खाटेवर झोपवतात. अंगावर पांघरूण ओढतात.)

बाई : मधू, झोप हं बाळ.

शास्त्री : असं झोपेतून उठू नये. इथं चोरी झालीय कुठं? छे! चोरी झालीच नाही!

(पडदा पडतो.)

**प्रश्न :**

अ. खालील प्रश्नांची प्रत्येकी पाच ते सहा वाक्यांत उत्तरे लिहा.

१. इन्स्पेक्टर बनून आलेल्या तरुणाने 'मीच तो चोर' असे केव्हा सांगितले?

२. 'चोरी झालीच नाही' असे शास्त्री का सांगत होते?

आ. खालील प्रश्नांची प्रत्येकी तीन ते चार वाक्यांत उत्तरे लिहा.

१. शास्त्री व बाई यांना चोरी झाल्याचे केव्हा कळते ?

२. 'आपण बनावट दागिने का बनवून घेतले' याचे समर्थन शास्त्री कसे करतात ?

३. अण्णा आणि गंगाबाई यांनी शास्त्रींची कोणती चौकशी केली ?

४. चोराने दागिने परत का आणून दिले ?

**स्वाध्याय व उपक्रम :**

अ. कोण, केव्हा म्हणाले ? थोडक्यात लिहा.

१. "चोर असला म्हणून काय करणार आहे—मी इथं असताना ?"

२. "मुलाला असं बोलू नये !.... मुलं म्हणजे फुलंच ना ?".

आ. 'चोरी झालीच नाही,' हे शीर्षक पाटाला सार्थ आहे का ? पाच ते सहा वाक्यांत लिहा.

इ. पाठातील दर्शक व सामान्य सर्वनामे ओळखा.

**व्याकरण :**

म्हणजे चोरीच्या निमित्ताने यांच्या घोरण्याचा त्रास तरी टळला.

या वाक्यातील 'चोरीच्या' या शब्दाचा संबंध 'निमित्ताने' या शब्दाशी आहे. तसेच 'घोरण्याचा' या शब्दाचा संबंध 'त्रास' या शब्दाशी आहे. म्हणजे 'चोरीच्या' व 'घोरण्याचा' या दोन शब्दांचा संबंध या वाक्यातील 'टळला' या क्रियापदाशी नसून 'निमित्ताने' व 'त्रास' या दोन उपपदांशी आहे. अशा प्रकारच्या संबंधांना **उपपद संबंध** किंवा **उपपद विभक्ती** असे म्हणतात.

विभक्तींच्या रूपामुळे वाक्यातील शब्दाशब्दांमधील हे जे संबंध किंवा नाती जोडली जातात, त्यांना व्याकरणात विभक्तीचे अर्थ असे म्हणतात.

वाक्यातील नाम किंवा सर्वनाम यांचे क्रियापदाशी असलेले संबंध म्हणजे **कारकार्थ** होत. क्रियापदाशिवाय इतर शब्दांशी असलेल्या संबंधांना **उपपदार्थ** असे म्हणतात.

**अभ्यास :**

खालील वाक्यांतील उपपद विभक्ती ओळखा.

१. ज्याने तुम्हांला सिनेमाचा पास दिला, त्यानेच नाही ना चोरी केली ?

२. आठ-दहा हजारांचा माल म्हणजे मोठीच चोरी झाली.

□□□



# ३. गुरूचा न्याय

**पं. महादेवशास्त्री जोशी** (१९०६-१९९२) यांनी विविध विषयांवर विपुल लेखन केले आहे. 'भावबळ', 'कन्यादान', 'कथासुगंध' इत्यादी कथासंग्रह. 'तीर्थरूप महाराष्ट्र', 'महाराष्ट्राची धारातीर्थे' ही प्रवासवर्णने व इतरही अनेक पुस्तके प्रसिद्ध आहेत. 'भारतीय संस्कृती कोशाचे' ते संपादक होते.

आपल्या शिष्याचे कल्याण व्हावे, म्हणून गुरूला किती दूरदृष्टीने आणि कर्तव्यकठोरतेने वागावे लागते, याचे दर्शन या पाठातून घडते.

एक होता राजा. त्याला बऱ्याच वर्षांनी एक मुलगा झाला. त्या मुलाचे त्याने उत्तम संगोपन केले. तो सोळा वर्षांचा होईपर्यंत त्याला राजवाड्यातच, शिक्षकांची नेमणूक करून प्राथमिक शिक्षण दिले; पण मुलाच्या असल्या जुजबी शिक्षणावर राजा खूश नव्हता. राजपुत्राला तत्कालीन सर्व विद्यांचे व कलांचे अन् राज्यशास्त्राचे उत्तम शिक्षण मिळावे, तो विद्‌वान, चतुरस्र व्हावा असे त्याला वाटे.

त्या काळी तक्षशिलेची विद्‌वत्तेबद्‌दल ख्याती होती. अनेक शास्त्रांत पारंगत असे महापंडित तक्षशिलेत अध्यापनाचे काम करत. तक्षशिलेत चांगला अभ्यास करणारा विद्यार्थी सूर्यासारखा तेजस्वी होऊन बाहेर पडे. राजाने आपल्या पुत्राला तक्षशिलेलाच पाठवायचे ठरवले. आपला हा मनोदय त्याला सांगितला. राजपुत्र तिकडे जायला राजी झाला. त्यालाही विद्येची गोडी होतीच. राजाने त्याची मोठ्या समारंभाने पाठवणी केली.

राजपुत्र मजल दरमजल करत तक्षशिलेला पोचला. तिथे त्याला मुलेच मुले दिसली. तिथे वाड्यावाड्यांतून वेदांची संथा कानी पडे; शास्त्रांची चर्चा ऐकू येई.

'इथले महान आचार्य कोण?' असे राजपुत्राने विचारताच एका शिष्याने त्याला एक नाव सांगितले.

राजपुत्र त्यांचा पत्ता विचारत विचारत विद्यालयात गेला. आचार्यांना वंदन

करून पुढे उभा राहिला. आचार्यांनी त्याला स्नान-संध्यादी कृत्ये उरकून यायला सांगितले.

राजपुत्राने आवश्यक त्या सर्व गोष्टी केल्या; भोजन उरकले. आचार्य दुपारची विश्रांती घेऊन उठून बसलेले पाहिल्यावर राजपुत्राने पुन्हा त्यांचे दर्शन घेतले.

"कुठून आलास तू ?" आचार्यांनी विचारले.

"मी वाराणसीहून आलो. मी तिथला राजकुमार आहे. वडिलांनी विशेष अध्ययनासाठी मला इकडे पाठवलं आहे."

"मन लावून अभ्यास करशील ? सहाध्यायांशी बरोबरीच्या नात्याने वागशील ? राजपुत्र आहेस म्हणून विचारतो."

"आपल्या इच्छेप्रमाणे वागेन, आचार्य."

"ठीक आहे. आजपासून तू माझा शिष्य झालास. माझ्या पाठशाळेत मी तुला प्रवेश दिला आहे."



इतर शिष्यांबरोबर राजपुत्राचेही शिक्षण चालू झाले. राजपुत्र त्या पाठशाळेत रुळला, रमला. अभ्यासही मन लावून करू लागला. आचार्यांना विविध शंका विचारू लागला. राजपुत्राचा तो चौकसपणा पाहून आणि त्याची वागणूक बघून आचार्य खूश झाले.

एके दिवशी स्नानाला जात असता राजपुत्राने एका अंगणात पांढरे तीळ वाळत घातलेले पाहिले. एक म्हातारी त्या तिळांची रखवाली करत बसली होती. राजपुत्राला ते तीळ खाण्याचा मोह झाला. त्याच्या तोंडाला पाणी सुटले. आचार्यांसह सर्वजण पुढे गेले होते. म्हातारीची नजर चुकवून त्याने त्या वाळवणातले मूठभर तीळ उचलले आणि त्यांचा बकाणा भरला. म्हातारीची नजर तीक्ष्ण होती. तिने राजपुत्राला हटकले; पण तो तिच्याकडे लक्ष न देता विद्यार्थ्यांत येऊन मिसळला.

दुसऱ्या दिवशी पुन्हा राजपुत्राने तीच गोष्ट केली. तिसऱ्या दिवशीही तसेच घडले, तेव्हा मात्र तिने आचार्यांना हाक मारली. आचार्य तिच्याकडे गेले.

म्हातारीने घडला तो प्रकार सविस्तर सांगितला —

''तुमच्या या शिष्याने माझ्या वाळवणातले मूठभर तीळ खाल्ले. असा हा याचा क्रम तीन दिवस चालू आहे. मी दोन दिवस गप्प बसले, पण आज तिसऱ्या दिवशीही पुन्हा तोच प्रकार!''

''सांगितलंस ते बरं केलंस. ही खोड वाईट आहे. मी त्याचा बंदोबस्त करतो.''

असे म्हणून आचार्य राजपुत्राकडे वळले. त्याला त्यांनी दटावून विचारले, ''काय, हे खरं आहे का ?''

राजपुत्राने आपला गुन्हा कबूल केला. त्यावर आचार्य म्हणाले,

''राजपुत्रा, एखादया वस्तूचा मोह उत्पन्न होणं, ही गोष्ट फार वाईट. तशातही तो मोह न आवरता दुसऱ्याची वस्तू त्याच्या नकळत उचलणं हे त्याहून महावाईट. ही चोरी आहे अन् राजपुत्रानं अशी चोरी करणं म्हणजे कुंपणानंच शेत खाण्यासारखं आहे. या चौर्यकर्माबद्दल मी तुला शिक्षा करणार आहे.''

असे म्हणून आचार्यांनी म्हातारीच्या देखत तिळाच्या मुठीबद्दल राजपुत्राला

चांगलेच खडसावले. सर्व सहाध्यायांनी हे पाहिले, ऐकले. राजपुत्राला मेल्याहून मेल्यासारखे झाले. त्याला आचार्यांचा संताप आला. वरकरणी काही करता येईना; त्यामुळे तो आचार्यांवर मनोमन जळत राहिला. 'आचार्य, इथं तुमचं राज्य आहे. मला काही करता येत नाही; पण मी राजपुत्र आहे. काही वर्षांनी वाराणसीचा राजा होईन, त्या वेळी पाहून घेईन', असे तो मनातल्या मनात घोळवत राहिला. सूडबुद्धीने त्याला पुरते घेरले.

यथाकाळ राजपुत्राचे अध्ययन पुरे झाले. आचार्यांनी त्याला समारंभपूर्वक निरोप दिला. त्या वेळी राजपुत्र विनम्र आवाजात आचार्यांना म्हणाला,

''गुरुवर्य, आपण मला विद्या दिलीत. सर्व शास्त्रांत मला प्रवीण केलंत. आपले हे माझ्यावर अनंत उपकार आहेत. विद्यादाता गुरू हा विद्यार्थ्यांचा दुसरा पिता होतो; म्हणून आपण मला पितृतुल्य झाला आहात. आपला वियोग मला कायमचा जाणवणार आहे. इथून गेल्यावर मी वाराणसीचा राजा होईन. त्या वेळी आपण एकवार माझ्या राजधानीला भेट द्या. मला आपला राजेशाही सत्कार करायचा आहे. माझ्या अधिकाऱ्यांना आणि प्रजेला आपलं पवित्र दर्शन मला घडवायचं आहे.''

''ते सगळं ठीक रे; पण माझ्या अध्यापन कार्यातून अशी सवड मिळणं दुरापास्त. तू नीतिन्यायाने राज्य केलंस की मला सत्कार पोचला.''

''ते चालणार नाही गुरुवर्य. हा माझा हट्ट आहे, अन् तो तुम्ही पुरवलाच पाहिजे.''

''ठीक, ठीक! सवड काढून येईन मी.''

आचार्यांकडून एवढे आश्वासन घेऊन राजपुत्र तक्षशिलेहून निघाला. यथाकाळ वाराणसीला पोचला. आपला मुलगा विद्यावंत होऊन परत आलेला पाहून राजाने त्याचे कौतुकाने जाहीर स्वागत केले.

राजा आता वयोवृद्ध झाला होता. त्याला वाटले, आता राज्यभार मुलाच्या शिरावर देऊन आपण वानप्रस्थ स्वीकारावा. आत्मचिंतनात उरलेले आयुष्य घालवावे. आपला बेत त्याने अमात्य प्रधानांना बोलून दाखवला. त्यांनी संमती दिली. लगेच मुहूर्त निश्चित करण्यात आला आणि त्या दिवशी मोठ्या समारंभाने राजपुत्राला राज्याभिषेक करून सिंहासनावर बसवण्यात आले. राजपुत्र होता तो राजा झाला. सर्वसत्ताधीश बनला.

पण तीन मुठी तीळ खाल्याबद्दल आपल्याला आचार्यांनी सर्व सहाध्यायांसमक्ष खडसावल्याचा प्रसंग राजाच्या मनात सलत होता. ती आठवण तो विसरला नव्हता. किंबहुना त्याला ती विसरायची नव्हती. त्याबद्दल तो आचार्यांना जन्माची अद्दल घडवणार होता; म्हणून त्याने नम्रतेचे, साळसूदपणाचे एक पत्र लिहून आचार्यांना भेटीचे निमंत्रण दिले.

आचार्यांना ते निमंत्रण मिळाले. शिष्याचे अगत्य कळून आले. आपल्या शिष्याची इच्छा अपुरी ठेवणे योग्य नव्हे, असे त्यांना वाटले. त्यांनी वाराणसीला जाण्याची तयारी केली. समागमे काही शिष्यही घेतले. आचार्य वाराणसीला आले.



राजवाड्याच्या महाद्वारात आचार्य पोचताच द्वाररक्षकांनी तशी आत वर्दी दिली. राजाने आचार्यांना आत बोलावले. आचार्य त्यांच्यासमोर गेले. राजा सिंहासनावर रेलून बसला होता. तो उठला नाही किंवा पुढे झुकलाही नाही. त्याने आचार्यांना 'या' म्हटले नाही, की आसनही दिले नाही. तो उग्र शब्दांत आपल्या प्रधानांना म्हणाला,

''प्रधानमंडळी हो ! हा तक्षशिलेचा आचार्य स्वतःला विद्वान समजतो, धार्मिक समजतो. यानं माझा, एका राजपुत्राचा पाणउतारा केला. मला अपमानित केलं. त्याबद्दल याला जबरदस्त शिक्षा करण्यासाठी मी इथं बोलावून आणलं आहे. तुम्ही याला अंधारकोठडीत ठेवा आणि योग्य दिवस पाहून याचा जाहीर शिरच्छेद करा.''.



राजाज्ञा कठोर होती, अन्यायाची होती; पण आचार्य डगमगले नाहीत. ते ताठ मानेने उभे राहिले. "शिष्योत्तमा, मला दोन शब्द बोलायची परवानगी देतोस?" असे त्यांनी राजाला विचारले.

"बोल, तुला काय बोलायचं ते बोल. पश्चात्ताप करायचा, तर करून घे. कारण तुझं आयुष्य आता थोडं उरलं आहे."

"मला पश्चात्ताप करायचा नाही. मला माझ्या आयुष्याची फिकीर नाही. मी जे केलं ते अगदी योग्यच केलं. मला ते करणंच भाग होतं. ते मी केलं नसतं, तर मी माझ्या कर्तव्याला चुकलो असतो. चांगलं वळण लावण्यासाठी गुरुजन जी शिक्षा करतात, त्यांचा थोर पुरुष राग धरत नाहीत. तशी शिक्षा आवश्यकच असते. ती दुष्टपणाने केली जात नाही. राजा, विचार कर. तुझ्या दरबारात अनेक लोक आपले कज्जे-खटले घेऊन येतात. त्यापैकी जे खोटे असतील, अपराधी असतील, त्यांना तू दंड करतोस. हा दंड तू सूडबुद्धीनं करतोस काय? मुळीच नाही. ती शिक्षा अपराधाबद्दल असते. अपराध्यानं पुन्हा अन्यायानं वागू नये आणि त्याची इतरांना देख लाभून त्यांनीही अन्याय करण्यापासून परावृत्त व्हावं, यासाठी ती शिक्षा असते. गुरूही आपला शिष्य अन्यायानं वागला तर त्याला शिक्षा करतो ती त्याचसाठी. ते गुरूचं कर्तव्य असतं. मी तुला अरेरावीनं बोललो नाही, तर तुझ्या जन्माच्या कल्याणासाठी बोललो. अरे, तीन मुठी तिळांचा प्रश्न नव्हता. प्रश्न होता, त्यामागच्या मनोवृत्तीचा. राजा विचार कर, मी त्या वेळी तुला खडसावलं नसतं, तर तुझी चोरून खाण्याची प्रवृत्ती वाढली असती. तू हळूहळू मोठ्या चोऱ्या करू लागला असतास. त्या पचल्या असं पाहून पुढे दरोडेही घालू लागला असतास. मग तक्षशिलेच्या राजानं तुला पकडून तुझा हात तोडला असता आणि तुझं चौर्यकर्म तुझ्या वडिलांच्या कानी गेलं असतं, तर त्यांनी जन्मात कधी तुला राज्य दिलं नसतं. आज जो तू राजपदावर अधिष्ठित आहेस, तो मी त्या वेळी तुला खडसावल्यामुळे आहेस. त्यामुळे तर तुझी ती चोरीची प्रवृत्ती शमली. मला वधदंड द्यायला तू समर्थ आहेस, पण तसा तो देणं योग्य आहे का? आणि मला इथं फसवून आणून तो देणं तुला शोभणार आहे का? याचा दहा वेळा विचार कर, मी वधदंड स्वीकारायला सिद्ध आहे."

आचार्यांचे ते निःस्पृह अन् सडेतोड भाषण ऐकताना आणि तो प्रसंग पाहताना राजाच्या आधी प्रधानमंडळी लज्जित झाली. त्यांच्यापैकी एक प्रधान पुढे होऊन मोठ्या धीराने बोलला,



"महाराज, आचार्यांवर क्रुद्ध होऊ नका. भलतंच साहस करू नका. एका महाविद्वान आणि पवित्र आचार्यांच्या रक्ताने तुम्ही हे राजसिंहासन कलंकित करू नका. आचार्यांनी केलं ते योग्य केलं आणि ते तुमच्या भल्यासाठी केलं, असंच आम्हांला वाटतं."

आता मात्र राजा पुरता खजील झाला. त्याच्या हृदयात सद्विचार दाटून आला. आपल्या आताच्या उद्धट अन् असंस्कृत वर्तनाबद्दल त्याची त्यालाच लाज वाटली. तो खडबडून सिंहासनावरून उतरला. धावत जाऊन त्याने आचार्यांच्या पायांना मिठी घातली. 'गुरुदेव' एवढेच शब्द त्याच्या तोंडून उमटले. पुढचे शब्द अश्रूंत भिजून वाहून गेले. आचार्यांनी राजाला उठवून त्याला हृदयाशी धरले. त्याची पाठ थोपटली.

"राजा, तू माझ्यावर अन्याय केलास याचं मला दुःख नाही. तुझ्या हृदयात विवेकाचा उदय झाला याचा मला आनंद आहे."

"गुरुदेव, मी अपराधी आहे. मला त्याचा विलक्षण पश्चात्ताप होतो आहे. राज्य करण्याचा नैतिक अधिकारच मी गमावून बसलो असं मला वाटतं. मी खाली उतरतो. त्या सिंहासनावर आता तुम्ही बसा. वाराणसीचं धर्मराज्य तुम्ही करा."

"वेडा कुठला! आम्ही आचार्य लोक राज्य करण्यासाठी जन्माला आलेलो नाही. आमचं कार्य वेगळं आहे. तेव्हा मला तुझं राज्य नको. धन, वैभव नको; काही नको. तू तरुण आहेस. राजकुलात जन्मलेला आहेस. विद्यासंपन्न आहेस. तेव्हा राज्य तूच करायचं, मात्र ते धर्मन्यायानं कर अन् कधीही, कोणाशीही सूडबुद्धीनं वागू नकोस."

"गुरुदेव, जिवात जीव असेपर्यंत मी तुमच्या उपदेशाप्रमाणे वागेन!" असे म्हणून राजाने पुनश्च आचार्यांचे पाय धरले.

**प्रश्न :**

खालील प्रश्नांची प्रत्येकी पाच-सहा वाक्यांत उत्तरे लिहा.

१. राजाने आपल्या मुलास तक्षशिलेलाच अध्ययनास का पाठवले ?

२. आचार्य राजपुत्रावर कोणत्या गोष्टीमुळे खूश झाले ?

३. आचार्यांनी राजपुत्राला तीव्र शब्दांत केव्हा खडसावले ?

४. राजाने आचार्यांना राजदरबारात बोलावून त्यांचे स्वागत कोणत्या शब्दांत केले?
५. 'तुझ्या हृदयात विवेकाचा उदय झाला याचा मला आनंद आहे', असे आचार्य राजाला केव्हा म्हणाले ?

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. या पाठास 'विद्यार्थ्यांतील परिवर्तन' असेही नाव देता येईल का ? सात ते आठ वाक्यांत स्पष्टीकरण करा.
२. पाठातील क्रियाविशेषणे शोधून काढा.
३. धौम्य-अरुणी, द्रोणाचार्य-एकलव्य, द्रोणाचार्य-अर्जुन या गुरुशिष्यांपैकी एकावर वर्गात १०-१२ वाक्यांत गोष्ट सांगा.
४. पूर्वी शिक्षणासाठी अस्तित्वात असलेल्या 'आश्रमपद्धती'ची अधिक माहिती मिळवा.

**व्याकरण :**

एक होता राजा.

त्याला बऱ्याच वर्षांनी एक मुलगा झाला.

त्या मुलाचे त्याने उत्तम संगोपन केले.

वरील प्रत्येक विधान म्हणजे एक स्वतंत्र वाक्य आहे. या वाक्यांत सांगणाऱ्याला फक्त काहीतरी सांगायचे आहे. हे सांगताना त्याच्या मनात कोणताच हेतू नाही. केवळ विधान करणे एवढेच अशा वाक्यांचे काम. अशा वाक्यास **विधानार्थी** किंवा **साधे वाक्य** म्हणतात.

इथले महान आचार्य कोण ?

तू कुठून आलास?

वरील वाक्ये केवळ विधानार्थी नसून यांतील प्रत्येक वाक्यात प्रश्न विचारला आहे. या वाक्यांत बोलणाऱ्याला काही माहिती हवी आहे. यासाठी असे प्रश्न विचारले आहेत. अशा प्रकारच्या वाक्यांना **प्रश्नार्थी वाक्ये** असे म्हणतात.

**अभ्यास :**

खालील वाक्यांपासून प्रश्नार्थी वाक्ये तयार करा.

१. राजाने आपला मनोदय त्याला सांगितला.
२. असा याचा क्रम तीन दिवस चालू आहे.
३. आचार्य तिच्याकडे गेले.
४. राजपुत्र सर्वसत्ताधीश बनला.



# ४. निसर्ग : आपला मित्र

**डॉ. सलीम अली** (१८९६-१९८७) प्रख्यात पक्षितज्ज्ञ. पक्षी निरीक्षणासाठी सबंध भारत देशात भ्रमंती. त्यांनी वनस्पतींविषयीही संशोधन केले. 'दी बुक ऑफ इंडियन बर्ड्स' हे त्यांचे प्रसिद्ध पुस्तक. १९७६ साली भारत सरकारने 'पद्मविभूषण' पदवी देऊन त्यांचा गौरव केला.

प्रस्तुत उतारा 'द फॉल ऑफ ए स्पॅरो' या त्यांच्या आत्मचरित्रात्मक पुस्तकातून संकलित केला आहे.

माझे बालपण गिरगावातील खेतवाडीत मोठ्या मजेत गेले. माझ्या आईवडिलांचे माझ्या लहानपणीच निधन झाल्यामुळे आम्हा भावंडांना आमच्या मामामामींनी वाढवले. माझे मामा स्वभावाने खूप प्रेमळ आणि मुख्य म्हणजे लहान मुलांच्या प्रश्नांचे योग्य प्रकारे शंकानिरसन करणारे होते. कदाचित त्यांच्या याच स्वभावामुळे माझ्या जिज्ञासू वृत्तीला खतपाणी मिळाले. लहान असताना मला दरमहा दोन रुपये वरखर्चासाठी मिळायचे. त्यातून थोडेसे पैसे वाचवून मी क्रॉफर्ड मार्केटला जात असे. तेथे विविध पक्षी बघायला मिळत. मी बचत केलेल्या पैशांतून एखादा पक्षी पाळायला म्हणून विकत घेत असे. आठ-दहा वर्षांचा होतो मी तेव्हा! पक्ष्यांच्या आयुष्याबद्दल मला उपजतच विलक्षण कुतूहल होते. एकदा मी एक चिमणी घेतली आणि माझ्या मामांना म्हणालो, ''मामा, ही चिमणी पाहा. पिवळा डाग आहे तिच्या गळ्यावर.''

''बघू बघू!'' मामांनी उत्सुकतेने माझे भविष्य उज्ज्वल करायला कारणीभूत झालेली ती चिमणी पाहिली. त्यांनाही ती वेगळ्या जातीची वाटली.

''कुठली चिमणी आहे ही? हा डाग कसला? काय नाव असावं बरं?'' माझ्या प्रश्नांचा भडिमार थांबवत मामा मला जवळ घेऊन प्रेमाने म्हणाले, ''बेटा, तुला खरंच इतकी जिज्ञासा आहे?''

''होय! मला हवीय ही सगळी माहिती! तुम्ही सांगाल?'' मी लडिवाळपणे म्हटले.

"नाही रे! पण हे बघ. मी तुला एक चिठ्ठी देतो. ती घे आणि भेट त्यांना!" असे म्हणून मामांनी मुंबई नॅचरल हिस्टरी सोसायटीच्या सन्मान्य सचिवांची - वॉल्टर सॅम्युअल मिलार्ड यांची - भेट घेण्यासाठी माझ्याजवळ एक पत्र लिहून दिले. मिलार्डसाहेबांची भेट हा माझ्यासाठी एक रोमांचकारी, सुखद आणि क्रांतिकारक अनुभव ठरला. माझ्यासारखा आठ-दहा वर्षांचा कोवळा मुलगा ती पिवळ्या डागाची छोटीशी चिमणी घेऊन त्या गोऱ्या साहेबाला मोठ्या उत्सुकतेने भेटायला निघाला होता. काहीसा घाबरतच! कारण चहाच्या मळ्यावर इंग्रजांनी केलेले अन्याय मला माहीत होते. त्या बालवयात सगळीच इंग्लिश माणसे राक्षसी वृत्तीने वागतात अशी माझी समजूत होती; पण मिलार्डचा हसरा, आनंदी आणि धीर देणारा चेहरा पाहताच माझी भीती नाहीशी झाली. मि. मिलार्ड माझ्यावर एकदम खूश झाले होते. कदाचित मी त्यांना चिकित्सक आणि धीट वाटलो असेन. "ये बाळ, बस." अशा शब्दांत त्यांनी माझे स्वागत केले. मी त्यांच्याजवळ बसलो.

"बोल, माझ्या छोट्या मित्रा, काय काम आहे तुझं?" मिलार्डसाहेबांनी प्रश्न केला.

कागदाच्या पिशवीतून जपून आणलेली ती पिवळ्या डागाची चिमणी मी त्यांना दाखवली. ती चिमणी पाहताच मिलार्डसाहेब एकदम उद्गारले, "ओ हो! पिवळ्या कंठाची चिमणी!"

नंतर त्यांनी मला पक्ष्यांच्या दुनियेतल्या महत्त्वपूर्ण गोष्टी उलगडून सांगितल्या. भारतात किती प्रकारचे पक्षी आहेत, ते कसे ओळखायचे, त्यांची वैशिष्ट्ये कोणती वगैरे सखोल माहिती मिलार्डसाहेबांनी मला आपुलकीने करून दिली. अर्थातच पक्ष्यांबद्दलचे मुळातच असलेले माझे आकर्षण जास्तच वाढले. एवढेच नाही, तर मि. मिलार्डनी मला पक्ष्यांसंबंधी उपयुक्त, माहितीपूर्ण पुस्तके वाचायला दिली. तसेच माझी त्यांच्या सहकाऱ्यांशी ओळख करून दिली. त्यांनीही माझा उत्साह द्विगुणित करून मला पक्ष्यांच्या अभ्यासासंबंधी मार्गदर्शन आणि मदत केली. मिलार्डसाहेबांनी मला पक्षी पाळण्यास उद्युक्त केले हे खरेच; पण मलाही त्याआधी पक्षी विकत घेऊन पाळण्याचा छंद होता, हे मी आधी नमूद केले आहे.

पक्ष्यांच्या जगातील गमतीशीर माहिती मला मि. मिलार्डनीच फार सोप्या आणि आकर्षक शब्दांत सांगितली. पक्षी निरीक्षणाचे बीज तेव्हा माझ्यात पेरले गेले, असे मला वाटते. त्यांनी माझ्यापुढे खुले केलेले पक्षीभांडार मी अत्यंत काळजीपूर्वक न्याहाळले. या आणि अशा कितीतरी प्रकारच्या लहान लहान घटनांतून मी घडत गेलो.

शाळेत असताना एकदा मला माझ्या उत्तम वागणुकीबद्दल एक पुस्तक बक्षीस मिळाले होते. त्या पुस्तकाचे नाव होते 'आपले प्राणिमित्र'. माझ्या आवडीच्या विषयाचे पुस्तक योगायोगाने मला मिळाले होते याचा मला खूप आनंद झाला.

शालेय शिक्षण पूर्ण झाल्यावर मी महाविद्यालयीन शिक्षणाकडे वळलो; पण ते अर्धवट सोडून मला १९१४ साली म्हणजे वयाच्या १८ व्या वर्षी म्यानमारमध्ये (ब्रम्हदेशात) माझ्या भावाच्या उद्योगधंद्यात मदत करायला जावे लागले. माझा भाऊ म्यानमारमध्ये (ब्रम्हदेशात) 'तेवॉय' या एका छोट्याशा शहरवजा गावात राहत असे. त्या गावात आपल्याकडील अंदमानाप्रमाणे गुन्हेगारांची वसाहत होती. मी माझ्या भावाकडे त्याच्या उद्योगधंद्यात मदत करण्यासाठी गेलो होतो हे खरे, पण तिथेही मी पक्षी निरीक्षणासाठी दर शनिवारी-रविवारी शहराबाहेर पडत असे. त्या सुमारास माझे या संदर्भातील वाचन खूपच वाढले. पक्षी जीवनावरील कितीतरी पुस्तके मी वाचून काढली. तेथील विविध पक्ष्यांचे निरीक्षण करून टिपणे लिहिली. पक्षी निरीक्षणाची पहिली टिपणी मी माझ्या वयाच्या नवव्या वर्षीच लिहिली होती; पण ही पहिली निरीक्षण टिपणी मात्र प्रकाशित झाली त्यानंतर ६० वर्षांनी. असो.

माझा पक्षी निरीक्षणाचा छंद जोमाने वाढत होता. निसर्गाच्या इतिहासावर लिहिलेल्या पुस्तकांचेही मी खूप वाचन केले. अभ्यास केला. माझ्या वाचनाचा मला माझ्या छंदासाठी फार उपयोग झाला. म्यानमारमधून (ब्रम्हदेश) परत मुंबईला आल्यावर मी माझे अर्धवट राहिलेले महाविद्यालयीन शिक्षण पूर्ण केले आणि शास्त्रामध्ये पदवी संपादन केली. पुढे मला माझ्या मनाप्रमाणे, आवडीप्रमाणे 'मुंबई नॅचरल हिस्टरी सोसायटी'मध्ये प्राध्यापकाची नोकरी मिळाली. १९३० ते १९५० या कालखंडात मी देशात व परदेशात केलेल्या भिन्न भिन्न पक्ष्यांच्या निरीक्षणांच्या

आधारावर 'केरळातील पक्षी' हे पुस्तक तयार केले. एका इवल्याशा चिमणीने मला भविष्यकाळात कितीतरी राष्ट्रीय आणि आंतरराष्ट्रीय मानसन्मान मिळवून दिले. पक्षी निरीक्षणाच्या क्षेत्रातील माझ्या दुर्मिळ कामगिरीबद्दल भारत सरकारने १९७६ मध्ये 'पद्मविभूषण' हा किताब देऊन माझा गौरव केला. १९५३ ते १९८३ हा माझ्या आयुष्यातील कालखंड म्हणजे सोनेरी अक्षरांत लिहिलेला माझ्या निरनिराळ्या पारितोषिकांचा इतिहास आहे असेच म्हणावे लागेल.



पक्षी निरीक्षण या छंदातील माझे कुतूहल वाढत गेले. शिवाय या छंदामुळे माझी धीर धरण्याची, चिकाटीची वृत्ती वाढली. वैज्ञानिक जगापासून या छंदाने मला दूर ठेवले. मला निसर्गाच्या जवळ नेले. त्यामुळे माझे मन नेहमीच ताजेतवाने राहू शकले. पर्यावरणाचे संतुलन आता बिघडत चालले आहे. त्यामुळे खूप वाईट परिणाम होतील. वृक्ष, पशू, पक्षी व माणूस यांचे जीवन परस्परावलंबित असल्यामुळे वेगाने होणाऱ्या वैज्ञानिक प्रगतीमुळे निसर्गातील संतुलन बिघडून मानवाचे नुकसान होण्याची मला भीती वाटते. लहानपणापासून मुलांवर, निसर्गावर प्रेम करण्याचे संस्कार होणे फार आवश्यक आहे. या निसर्गावर माझे प्रेम आहे. निसर्ग माझा सच्चा दोस्त आहे, असे मुलांना वाटले पाहिजे.

निसर्गावरच्या प्रेमापोटी मी माझ्या वयाच्या ८१ व्या वर्षी पुण्याच्या राष्ट्रीय संरक्षण प्रबोधिनीतील १२ ते १६ वर्षांच्या मुलांसाठी एक शिबिर भरवण्याची कल्पना व्हाइस ॲडमिरल आवर्टींपुढे मांडली. तेव्हा ते राष्ट्रीय संरक्षण प्रबोधिनीत होते. त्यांनी मला मोलाचे सहकार्य दिले. पुण्यातील 'राष्ट्रीय संरक्षण प्रबोधिनी' हे एक अभयारण्यच आहे असे म्हटले तरी हरकत नाही. ती कुमारवयीन मुले एक आठवडा तेथील जंगलात राहिली. मी त्यांना निसर्गातील गमतीजमतींवर माहिती सांगितली आणि माझे अनुभव विशद केले. किती मन लावून ऐकत होती ती मुले! मग त्या बालदोस्तांबरोबर मी त्या जंगलात खूप भटकलो. आम्ही डोंगर चढलो. पक्ष्यांची, प्राण्यांची निरीक्षणे केली. मुलांना खूप मजा वाटली. मग आम्ही प्राण्यांचे मातीत उमटलेले पावलांचे ठसे न्याहाळले. 'कुणाची पावले आहेत? चित्त्याची? लांडग्याची? पाहा पाहा...' असे प्रश्न विचारून मी मुलांना विचार करायला लावले. हळूहळू झाडे, पशू, पक्षी, नदी, डोंगर, समुद्र अशा निसर्गाच्या मोहक रूपांवर मुले प्रेम करायला शिकली. मुलांच्या विचारांत क्रांती झाली. हे मला त्यांनी नंतर विविध ठिकाणी 'नेचर क्लब' स्थापन केले यावरून पटले. व्हाइस ॲडमिरल आवर्टींच्या सहकार्याने यशस्वी झालेल्या माझ्या पुण्याच्या शिबिराने भावी 'नेचर क्लब ऑफ इंडिया मूव्हमेंट'ला जन्म दिला. यातच मला माझ्या आतापर्यंत केलेल्या या क्षेत्रातील धडपडीचे सार्थक झाल्यासारखे वाटले. या शिबिरातून मला कळले, की मुलांमध्ये स्वभावतःच

असलेल्या निसर्गाबद्दलच्या प्रेमभावनेला जागृत करण्याची फार आवश्यकता असते.

माझा तर असा अनुभव आहे, की निसर्गाच्या सहवासात राहण्यासारखा दुसरा आनंद नाही. डोंगरावर चढायला, जंगलात भटकायला, पक्ष्यांना बघत राहायला मला फार आवडते. या छंदामुळे मी मनाने प्रसन्न आणि शरीराने निरोगी राहू शकलो. निसर्ग आपला शेवटपर्यंत सोबत करणारा सच्चा दोस्त आहे, असेच मला वाटते.

**प्रश्न :**

खालील प्रश्नांची प्रत्येकी तीन ते चार वाक्यांत उत्तरे लिहा.

१. सलीम अली यांनी वरखर्चासाठी मिळणाऱ्या पैशांतून कोणता छंद जोपासला ?
२. मिलार्डसाहेबांची भेट हा माझ्यासाठी क्रांतिकारक अनुभव ठरला, असे सलीम अलींनी म्हटले आहे, ते का ?
३. सलीम अलींचा पक्षी निरीक्षणाचा छंद कसकसा वाढत गेला ? त्यातून त्यांनी कोणते यश प्राप्त केले ?
४. मुलांसाठी निसर्ग निरीक्षण शिबिर चालवून सलीम अलींनी काय साध्य केले ?
५. मुलांमधील निसर्गाबद्दलच्या प्रेमभावनेला जागृत करण्याची आवश्यकता सलीम अली यांना का वाटते ?

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. 'निसर्ग आपला सच्चा दोस्त' या विषयावर एक छोटासा निबंध लिहा.
२. तुम्ही जोपासलेल्या एखाद्या छंदाची माहिती देऊन तो वाढवण्यासाठी तुम्ही काय काय करणार ते लिहा.
३. एखादा छंद जोपासलेल्या आपल्या परिसरातील व्यक्तीची मुलाखत घेऊन त्याच्या छंदाची माहिती मिळवा.
४. जवळच्या निसर्गरम्य स्थळाला भेट देऊन तेथील पक्ष्यांची ओळख करून घ्या.
५. तुमच्या शाळेत निसर्ग निरीक्षण मंडळ स्थापन करा.

**व्याकरण :**

ओहो ! पिवळ्या कंठाची चिमणी !

किती मन लावून ऐकत होती ती मुले !

वरील वाक्यांत साधी विधाने नसून प्रत्येकात कोणती ना कोणती भावना व्यक्त केल्याचे दिसेल. 'चिमणी पिवळ्या कंठाची आहे' असे साधे विधान न करता 'ओहो !'

असा आश्चर्याचा उद्‌गार काढल्याने वाक्य अधिक परिणामकारक होते. वाक्यातील कल्पना अधिक खुलवून दाखवण्यासाठी वाक्यात त्या भावनेचा उद्‌गार काढलेला असतो. अशा वाक्यांना **उद्‌गारार्थी वाक्ये** म्हणतात.

| गट-१ | गट-२ |
|---|---|
| १. मला मैदानी खेळांचे जबरदस्त आकर्षण होते. | १. मला मैदानी खेळांचे मुळीच आकर्षण नव्हते. |
| २. निसर्ग माझा सच्चा दोस्त आहे. | २. निसर्ग माझा सच्चा दोस्त नाही. |
| ३. मुलांच्या विचारात क्रांती झाली. | ३. मुलांच्या विचारात क्रांती झाली नाही. |

वरील दोन गटांपैकी पहिल्या गटातील वाक्यांत कर्ता क्रिया करत असल्याचे सांगितले आहे. दुसऱ्या गटातील वाक्यांत नव्हते, नाही, नाही अशी नकार दर्शवणारी क्रियापदे आहेत.

ज्या वाक्यांत क्रियेचा होकार असतो अशा वाक्यांना **होकारार्थी वाक्ये** म्हणतात.

ज्या वाक्यांत क्रियेचा नकार असतो अशा वाक्यांना **नकारार्थी वाक्ये** असे म्हणतात.

**अभ्यास :**

कंसातील सूचनेप्रमाणे वाक्यरचना करा.

१. अशी जागृती फार महत्त्वाची आहे. (नकारार्थी करा.)

२. निसर्गाच्या सहवासात राहण्यासारखा दुसरा आनंद नाही. (होकारार्थी करा.)

३. मुलांना खूप मजा वाटली. (उद्‌गारार्थी करा.)





# ५. डॉल्फिन

**रमेश महाले** (जन्म : १९४४) बालकथा व विज्ञानविषयक अनेक पुस्तके प्रकाशित.

माणूस व डॉल्फिन यांत बरेच साम्य आहे. डॉल्फिन संशोधनात व इतर अनेक बाबतींत माणसाला मदत करतो. डॉल्फिन माशाबद्दलची ही उपयुक्त माहिती या पाठात आली आहे.

अरस्तू हे युनानमधील एक मोठे तत्त्वज्ञ होते. त्यांनी एके ठिकाणी लिहून ठेवले आहे, की एका मुलाची एका माशाशी मैत्री होती. तो मासा त्या मुलाला आपल्या पाठीवर बसवून रोज सकाळी सरोवराच्या दुसऱ्या टोकाला असलेल्या शाळेपर्यंत पोहोचवत होता आणि संध्याकाळी परत आणत होता.

तुम्हांला वाटेल ही एक शुद्ध थाप आहे. असा कोणता मासा आहे, की जो आपल्याशी दोस्ती करू शकेल? परंतु असा एक मासा आहे. तो तुमच्याशी दोस्ती करतो, तुम्हांला मदत करतो आणि काही बाबतींत त्याचे आपल्याशी साम्य आहे.

तुम्हांला माहीतच आहे, की प्राण्यांमध्ये माकड, कुत्रा, हत्ती आणि घोडा हे सर्वांत अधिक समजदार प्राणी आहेत; परंतु या सर्वांपेक्षा अधिक समजदार असा एक प्राणी आहे आणि तो म्हणजे डॉल्फिन मासा!

मानवानंतर डॉल्फिन हाच जगातला सर्वांत अधिक बुद्धिमान प्राणी आहे. हाच एकमेव प्राणी असा आहे, की त्याचा मेंदू मानवापेक्षाही मोठा आहे. डॉल्फिनच्या आणि मानवाच्या मेंदूत बरेच साम्य आहे. मानवाव्यतिरिक्त डॉल्फिन हा जगातला एकच प्राणी असा आहे, की ज्याला न्युमोनिया व हृदयविकार होतो. कित्येक डॉल्फिन 'हार्ट अॅटॅक'ने मरतात. मनुष्य व डॉल्फिन यांच्यात शारीरिकदृष्ट्याही बरेच साम्य आहे. त्याच्या कित्येक सवयी माणसासारख्या आहेत. डॉल्फिनमध्ये जर बोलण्याची क्षमता असती तर जगात माणसाऐवजी डॉल्फिनचे राज्य असते. त्या वेळी माणसाची काय स्थिती झाली असती याची कल्पनाच करता येणार नाही.

डॉल्फिन हा खोल समुद्रात राहणारा मासा आहे. त्याची लांबी सुमारे दहा फूट असते. त्याचे तोंड पक्ष्याच्या चोचीसारखे असते. त्याचा पोहण्याचा वेग ताशी सरासरी तीस मैल असतो. काही वेळा तर ते ताशी ४० ते ६० मैल वेगाने पोहतात.

डॉल्फिन मासा इतर माशांसारखा अंडी घालत नाही, तर तो सस्तन प्राणी आहे. माशांप्रमाणे त्याला कल्लेही नसतात. श्वास घेण्यासाठी मधून मधून त्याला पाण्याबाहेर यावे लागते.

डॉल्फिन विभिन्न प्रकारचे बत्तीस आवाज काढतो. डॉल्फिन माणसासारखा मोठमोठ्याने हसू शकतो; ओरडूही शकतो. शिकारीचा पाठलाग करताना तो गुरगुरतो आणि शिकार पकडल्याच्या आनंदाच्या भरात तो 'म्याऊ' असा आवाज काढतो. शत्रूला घाबरवण्यासाठी तो उच्च स्वरात ओरडतो.

डॉल्फिन माशाचे श्रवणेंद्रिय फारच तीक्ष्ण असते. आपल्या दूरच्या प्रवासात हे मासे एकमेकांशी एका विशेष प्रकारच्या ध्वनिलहरींनी संपर्क साधतात.

डॉल्फिनची दोस्ती फार प्रगाढ असते. ते आपल्याला मदतही करतात. गेल्या शतकात एका डॉल्फिनने अनेक जहाजांना खडकांवर आपटण्यापासून वाचवले व त्यांना योग्य मार्गदर्शन केले.

डॉल्फिनला माणसाबद्दल सहानुभूती वाटते. एकदा एक माणूस शार्कच्या तावडीत सापडला होता. शार्क मासे तर त्याचे तुकडे तुकडे करणार होते; परंतु तेवढ्यात तेथे काही डॉल्फिन आले आणि त्यातल्या एकाने माणसाला शार्कच्या तावडीतून सोडवून आपल्या पाठीवर बसवले आणि वेगाने किनाऱ्याला

पोहोचवले. मनुष्य त्या माशाच्या पाठीवरून उतरला. तेवढ्यात तो डॉल्फिन समुद्रात अदृश्य झाला.

१९४३ साली एक तरुणी पोहता पोहता खोल समुद्रात गेली. किनारा तिला दिसत नव्हता. त्यामुळे घाबरून ती बेशुद्ध पडली. जेव्हा ती शुद्धीवर आली तेव्हा ती किनाऱ्यावर होती; कारण एका डॉल्फिनने तिला बुडताना वाचवले आणि किनाऱ्यावर सुरक्षित पोहोचवले.

डॉल्फिन इतके माणसाळले आहेत, की ते आपल्याला न घाबरता अगदी जवळ येतात आणि निरनिराळ्या प्रकारचे खेळ खेळतात. आता डॉल्फिनचे खेळ सार्वजनिक प्रदर्शनात दाखवले जातात. ते निरनिराळ्या कसरती दाखवून प्रेक्षकांचे मनोरंजन करतात.



डॉल्फिन माणसांबरोबर किती मिसळतात याचे हे एक उदाहरण आहे. एके दिवशी कृष्णसागराच्या किनाऱ्यावरील 'अनापा' शहरात समुद्रस्नान करणाऱ्या शेकडो लोकांची पर्वा न करता एक डॉल्फिन किनाऱ्यावर आला. लोकांनी त्याला उचलून कोळ्यांकडे दिला. त्याला त्यांनी समुद्रात सोडले, परंतु तो डॉल्फिन पाण्यातून पुन्हा किनाऱ्यावर आला. लोकांनी त्याला भीती दाखवण्याचा प्रयत्न केला; परंतु तरीही तो पुन्हा पुन्हा किनाऱ्यावर येतच होता. तेव्हा किनाऱ्यावरील रक्षकाच्या लक्षात आले, की या डॉल्फिनच्या शरीरातून रक्त येत आहे. त्याने ओळखले, की डॉल्फिन जखमी झाला आहे. एका नर्सने प्रथमोपचाराची पेटी आणली; व त्याच्या जखमेवर औषध लावून पट्टी बांधली. त्या डॉल्फिनने एक फेरी मारली. जणू तो लोकांना अभिवादन करत होता. नंतर तो समुद्रात निघून गेला; परंतु थोड्याच वेळात डॉल्फिनची एक झुंड किनाऱ्यावर आली व त्यांनी लोकांचे मनोरंजन केले. जणू काही ते आपल्या साथीदाराच्या उपकारकर्त्यांना हार्दिक अभिवादन करत होते.

डॉल्फिन माशाचे एक वैशिष्ट्य म्हणजे तो आपल्यावर केलेले उपकार कधी विसरत नाही. १९६५ साली कर्नल मोकालोफ आपली उन्हाळ्याची सुटी घालवण्यासाठी क्रीमिया येथे गेला होता. तो एके दिवशी किनाऱ्यावर फिरायला गेला असताना त्याला एक डॉल्फिन मासा तडफडताना दिसला. त्याला दया आली. त्याने त्याला उचलून तलावात टाकले. हळूहळू कर्नल आणि डॉल्फिन यांची खूप मैत्री जडली. कर्नल रोज सकाळी तलावाजवळ जात असे, तेव्हा डॉल्फिन त्याची वाटच पाहत असे. सुटी संपत आल्यावर कर्नल जाण्याची तयारी करू लागला. त्याने तलावाकडे जाण्याचे बंद केले. त्याला वाटले, आता डॉल्फिन आपल्याला विसरला असेल. तो तेथून जाण्याआधी तलावाजवळ गेला. त्या वेळी तेथे त्याला तो डॉल्फिन मृत अवस्थेत दिसला. आपल्याला जीवदान देणारा बऱ्याच दिवसांतून आला नाही, म्हणून त्याने आपले प्राण अर्पण केले असावेत.

अशाच एका डॉल्फिनचा— 'आपोजेंक'चा— पुतळा न्यूझीलंडच्या किनाऱ्यावर उभारण्यात आला आहे. आपोजेंक आणि तेथील पोहणारे यांच्यामध्ये फार मैत्री होती. आपोजेंक त्यांच्याबरोबर वॉटरपोलो खेळत असे. तसेच तो लहान

मुलांना आपल्या पाठीवर बसवून समुद्रात फिरवून आणत असे; परंतु एके दिवशी एका वेगवान नावेने आपोजॅकला टक्कर दिली, तेव्हा तो मरण पावला. किनाऱ्यावरील त्याच्या मित्रांनी वर्गणी गोळा करून किनाऱ्यावरच त्याचा पुतळा उभारला. तो पुतळा त्या डॉल्फिनच्या आठवणीची साक्ष देतो.

याशिवाय डॉल्फिन समुद्राविषयी संशोधन करण्यातही मदत करतात. १९६० साली जेव्हा अमेरिकन शास्त्रज्ञांनी समुद्रात संशोधन सुरू केले, तेव्हा एका डॉल्फिनने त्यांना बरीच मदत केली.

शास्त्रज्ञांनी खोल पाण्यात एक प्रयोगशाळा स्थापन केली होती. जेव्हा एखादा शास्त्रज्ञ किंवा पाणबुड्या रस्ता चुकत असे तेव्हा डॉल्फिन त्यांना त्या प्रयोगशाळेत पोहोचवत असे. काही वेळा तो शास्त्रीय उपकरणेही प्रयोग शाळेपर्यंत पोहोचवत असे. डॉल्फिनला पाण्यात चांगले दिसते, म्हणून ते शास्त्रीय संशोधनात बरेच सहायक ठरतील असे शास्त्रज्ञांना वाटते.

'जॉन ली' या शास्त्रज्ञाचे म्हणणे आहे, की डॉल्फिन हे आपापसांत बोलतात. जर प्रयत्न केले तर डॉल्फिन माणसाप्रमाणे बोलू शकेल, असे त्याचे मत आहे. तो सध्या अनेक डॉल्फिनवर प्रयोग करत आहे. त्यांतील एका डॉल्फिनचे नाव त्याने 'एलोरा' ठेवले आहे. त्याला तो बोलायला शिकवत आहे. आता तो काही इंग्रजी शब्द बोलू शकतो. उदा. स्पीक, लाऊड. त्या शब्दांचा अर्थही त्याला समजतो.

या सर्व गोष्टींवरून डॉल्फिन निश्चित माणसाच्या खालोखाल बुद्धिमान प्राणी आहे, याची खात्री होते.

**प्रश्न :**

अ. खालील प्रश्नांची प्रत्येकी सहा ते सात वाक्यांत उत्तरे लिहा.

१. डॉल्फिन व माणूस यांच्यात कोणकोणत्या बाबतींत साम्य आहे ?
२. डॉल्फिन माशाला माणसाबद्दल सहानुभूती वाटते, हे कोणत्या प्रसंगांवरून दिसून येते ?
३. डॉल्फिनने माणसांकडून स्वतःच्या जखमेवर प्रथमोपचार कसा करून घेतला ?
४. आपोजॅकचा पुतळा कोणत्या आठवणीची साक्ष देतो ?
५. सध्या डॉल्फिन संशोधनात बरीच मदत करत आहे, असे का म्हटले आहे ?

आ. प्रत्येकी दोन वाक्यांत उत्तरे लिहा.

१. एका तत्त्वज्ञाने डॉल्फिनच्या मैत्रीसंबंधी काय लिहून ठेवले आहे ?
२. डॉल्फिन माणसाळले आहेत हे कोणत्या गोष्टींवरून दिसते ?
३. डॉल्फिनसंबंधात जॉन ली काय म्हणतो ?

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. डॉल्फिन माशावर दहा-बारा ओळी माहिती लिहा.
२. वाक्यांत उपयोग करा.
पर्वा न करणे, अभिवादन करणे, प्राण अर्पण करणे, साक्ष देणे.
३. एखाद्या मत्स्यालयास भेट द्या व तुमच्या शाळेत गुरुजींच्या मदतीने छोटेसे मत्स्यालय तयार करा.

**व्याकरण :**

मुलांनो, नियमित अभ्यास करा.
सर्वांनी डॉल्फिनवर प्रेम करावे.
डॉल्फिनला लळा लावला, तर तोही आपला मित्र होतो.

वरील पहिल्या वाक्यात उपदेश केला आहे. दुसऱ्या वाक्यात कर्तव्य सांगितले आहे व तिसऱ्या वाक्यात अट सांगितली आहे. म्हणजे या वाक्यांवरून क्रियेच्या काळाचा बोध होत नसून बोलणाऱ्याचा उद्देश किंवा हेतू समजतो. यालाच व्याकरणात **अर्थ** असे म्हणतात.

- **क्रियापद - स्वार्थ**

मुलगा नियमित अभ्यास करतो.

या वाक्यात साधे विधान आहे. कर्ता क्रिया करतो. या वाक्यावरून फक्त काळाचा बोध होतो. येथे क्रियापदाला स्वतःचा अर्थ आहे. वर्तमान, भूत व भविष्य या तीनही काळांत क्रिया करणाऱ्याचा हेतू नुसते विधान करण्याचा असतो. अशा वेळी क्रियापदांना **स्वार्थी क्रियापदे** असे म्हणतात.

- **क्रियापद - आज्ञार्थ**

शार्क माशापासून बचाव करण्यासाठी डॉल्फिनची मदत घ्या.

या वाक्यातील 'घ्या' या क्रियापदावरून बोलणाऱ्याचा हेतू साधे विधान करायचा नसून आज्ञा किंवा उपदेश करायचा आहे. क्रियापदावरून आज्ञा, विनंती, उपदेश किंवा आशीर्वाद देण्याचा हेतू दिसला तर त्याला **आज्ञार्थ** असे म्हणतात.

**अभ्यास :**

पुढील वाक्यांतील क्रियापदांचे अर्थ ओळखा.
१. डॉल्फिन हा जास्त बुद्धिमान प्राणी आहे.
२. समुद्रप्रवासात शार्क माशापासून सावध रहा.
३. डॉल्फिन मासा कृतज्ञ असतो.



# ६. शितू

**गो. नी. दांडेकर** (गोपाल नीलकंठ दांडेकर : १९१६-१९९८) कादंबरीकार म्हणून यांचा लौकिक आहे. 'पवनाकाठचा धोंडी', 'पूर्णामायची लेकरं', 'पडघवली', 'माचीवरला बुधा', 'शितू' इत्यादी कादंबऱ्या दांडेकरांनी लिहिल्या. 'स्मरणगाथा' हे त्यांचे आत्मचरित्र असून गाडगेबाबांचे चरित्रही त्यांनी लिहिले आहे. हा उतारा शितू या कादंबरीतील आहे.

कोकणातील वातावरणावर आधारलेली शितूची ही गोष्ट मनाला चटका लावून जाते.

बराच वेळ हाती पाटी घेऊन शितू 'ज्ञ'शी धडपडत बसली होती; पण तो काही तिच्यावर प्रसन्न होईना. अगोदर काना अन् आडवी रेघ तर तिने काढली, पण पुढले काही जमेना.

तिने खूप प्रयत्न केला. कान्याच्या अलीकडे 'प'सारखे पोट काढले, मग त्याच्या चहूबाजूंनी गाठी देऊन तिने पाटीला रांगोळी काढलेल्या अंगणाची शोभा आणली, पण शेवटी जेव्हा ती रांगोळी, तिची तिच्याच मनास येईना तेव्हा नाइलाजाने ती तिथून उठली.

तिने चहू दिशांना विसूचा कानोसा घेतला, पण तो कुठे गडप झाला होता कोण जाणे! ओटीवर सदू पुस्तकांची चळत पुढे मांडून पालथा पडून गणिते सोडवत बसला होता. निरुपायाने त्याच्याजवळ जाऊन शितू भिंतीशी उभी राहिली.

ती आल्याचे सदूला कळले. मान वर न उचलता गंभीर स्वरात तो म्हणाला, "काय आहे ?"

आता बोलणे प्राप्तच होते.

"सदूभाऊ एवढा हा ज्ञ..."

"पाहू!"

शितूने पाटी सदूपुढे केली. आपले हसे दाबत गंभीरपणाने तो म्हणाला,

"छान आहे. आता काय हवं आहे ?"

"छान कसा ? हा काही जमत नाही मला तेवढा..."



"पेन्सिल दे."

शितूने दिलेली पेन्सिल हाती घेऊन सदूने पाटीवर 'ढ' काढला.

शितू आश्चर्याने म्हणाली,

"सदूभाऊ हा तर 'ढ' आहे !

"विसूचं चित्र आहे ते. उनाडक्या करत हिंडणाऱ्या...."

"द्या सदूभाऊ माझी पाटी!" किंचित रागावून शितू म्हणाली.

पाटी फेकून् सदू म्हणाला,

"पुन्हा माझ्याकडे येत जाऊ नकोस. तुझा मैतर विश्या..."

त्याचे शब्द ऐकायला काही शितू तिथे थांबली नाही. ती लाल होऊन परसात विसूला शोधत निघाली. शेवटी तो तिला एका चिकूच्या झाडावर चढून हातीच्या चुडीने तांबड्या मुंगळ्यांचे पोळे भाजण्याच्या तयारीत असलेला दिसला.

झाडाखाली जाऊन ती म्हणाली,

"विसूदादा!"

"बाजूला हो शित्ये. मुंगळे पडतील ना अंगावर!"

"पडू द्या. पण अगोदर खाली उतरा!"

"कशाला?"

हातची चूड फेकत खालच्या फांदीवर पाय ठेवून विसूने विचारले.

सदूने त्याची काढलेली परवड त्याला सांगण्यासाठी शब्दांची पलटण अगदी तिच्या ओठांवर येऊन टेकली, पण तिला काय वाटले कोण जाणे. ती म्हणाली,

"मला 'ज्ञ' काढून द्या!"

फांदीवरून धप्पदिशी उडी फेकत विसू म्हणाला,

"शित्ये अगदीच ही आहेस हो तू... एवढ्यासाठी का मला खाली उतरवलंस?"

"विसूदादा, तुम्ही खूप अभ्यास करत जा! लोक तुम्हांला म्हणतात...."

"काय म्हणतात? कोण म्हणतात?"

"कोण म्हणतात... कोणी नाही! मीच म्हणत्ये," डोळ्यांतले पाणी पुसत शितू बोलली.

"खोटं! अन् तुझ्या डोळ्यांत पाणी का? कोण बोललं तुला?"

"कोणी नाही..."

"कोणी नाही कसं? बोललंच! सांग नाव!"

पटकन हसून शितू म्हणाली,

"आता कुणाचं नाव सांगू विसूदादा तुम्हांला? खरंच कोणी बोललं नाही मला. पण तुम्ही 'ज्ञ' काढून द्या बघू अगोदर!"

शंकित भावाने तिच्याकडे पाहत हाती पाटी घेऊन विसूने तिला 'ज्ञ' काढून दिला. तिथेच बसून तो गिरवत अन् त्याच्या खाली दुसरा 'ज्ञ' काढून दाखवत शितू म्हणाली,

"आता आला ना 'ज्ञ'?"

"आला हो."

शितूला अत्यानंद झाला. तिला आप्पांनी वाचायला शिकवले होते. 'रामा ऊठ, गवळी आला..' पासून तो 'वाहवा, वाहवा चेंडू हा...'पर्यंत सगळे धडाधड वाचू लागली होती ती. अन् आज तिला सगळी अक्षरेही लिहिता आली, अगदी शेवटपर्यंत.

संध्याकाळी भागूकाकाबरोबर ती घरी गेली. ढणढण जळणाऱ्या चिमणीसमोर जेव्हा ती अक्षरे काढत बसली, तेव्हा कौतुकाने भाग्या म्हणाला,

"शित्ये, यवरां सगरां इलां तुका?"

"हो भागूकाका! पण इलां तुका नाही म्हणायचं, आलं तुला म्हणायचं. आप्पा तसं म्हणतात."

"बरं हो बाय! आलां तुला म्हणंन!"

अशा गोड पोरीच्या भविष्याचा घेता येईल तितका ठाव घेत बराच वेळपर्यंत भागूकाका या कुशीवरून त्या कुशीवर वळत होता. शेवटी त्याला झोप लागली.

दिवसांमागे दिवस लोटत होते. आगोट सुरू व्हायला आली. बागेमागचा चोंढा आप्पा स्वतः करत. तो चोखाळण्यापासून त्याच्या कोपऱ्यात गोवरी टाकणे, कवळ फोडणे, पातेरी करणे, तणवणे, पुन्हा पातेरी करणे, गोवर टाकणे, खारीच्या वेळी माती लावणें ही सगळी कामे ते स्वतः अंगाने खपून करत. विसू त्यांना कधीतरी मदत करी.

या पाळीला शितू त्यांच्या बरोबरीने कामाला आली. चोंढ्यात खपताना ती शेवग्याच्या शेंगेसारखी लवे. थकणे तिला माहीत नव्हते. सगळे काम कसे रेखीव व स्वच्छ. कवळ ती असा फोडी, की भल्याभल्यांनी पाहत राहावे. तणवताना प्रत्येक पाचोळ्याची मूठ अशा सफाईने पसरी, की थोड्या पाचोळ्यांत काम भागे, अन् खालचा कवळ तर काही उघडा राहत नसे.

आकाशीचा राजा वर्षला. आवण तयार झाले. लावणीच्या दिवशी इरली डोईवर घेऊन आप्पा अन् शितू घराबाहेर पडली. त्यांच्या पाठोपाठ तिसरे इरले घेऊन विसूही निघाला. विसू आज कामाला आलेला पाहून आप्पा हसले, अन् म्हणाले,

"आज विसूला कसं काम सुचलं?"

तो काही न बोलता चोंढ्यातल्या गुडघाभर चिखलात उभा राहिला. रोपाची बांधली मूठ सोडून त्याने हाती धरली, अन् तो शितूला म्हणाला,

"शित्ये, चकवे म्हणत्येस?"

"म्हणा की!"

रोपाच्या चार काड्या खोवत विसू खड्या आवाजात म्हणाला,

"माली जातो र... मालिया
जो जो हार फुलांचा गलिया.."
शितूचे उत्तर आले,
"ऐशा शेवंतीच्या कलिया
जो जो हार फुलांचा गलिया..."
विसूने सवाल केला,
"ऐशा गुलाबाच्या कलिया
जो जो हार फुलांचा गलिया.."

शितूही काही मागे सरणारी नव्हती. त्या दोघांच्या स्पर्धेत मोगरा, जाई, जुई, सदाफुली, गोकर्णी, जास्वंदी, प्राजक्ती, अनंत, कुडा, तगर, कण्हेरी, रातराणी... सगळ्या पुष्पजातींचा उल्लेख झाला. शेवटी विसू जेव्हा गप्प राहिला, तेव्हा शितूने लावणीचे भरतवाक्य म्हटले,

"ऐशा मोत्यांच्या मनिया
जो जो हार तयांचा गलिया..."

यावर सगळे कुळवाडी खदाखदा हसले.

.... चोंढ्यापलीकडून वाहणाऱ्या पाटावर शितू म्हशीला पाणी पाजत उभी होती. म्हशीच्या पाठीवर हात टाकून तोंडाने 'लो लो लो लो लो' असे मंत्रपठन



चालू असता तिने पाहिले, की शेपट्या वर उभारलेल्या अन् पिले पोटाशी चिकटलेल्या वानरी पाहता पाहता चोंढ्यात शिरल्या, अन् फुले खाऊ लागल्या. शितू म्हशीला सोडून दगड घेऊन त्यांच्यावर धावली; हे पाहून त्या टोळीतला हुप्प्या पलीकडे कान खाजवत बसला होता. तो दात विचकावत तिच्यावर धावून आला.

शितू भयाने मागे सरली, अन् पळत तिने साद घातली,

"विसूदादा..... वानर आलेयत."

नारळीच्या झापाचे एक पान काढून त्याच्या फांदोऱ्यांचा तिपेडी चाबूक विणण्यात मग्न झालेल्या विसूच्या कानी ती साद थडकली. वानरांना चांगली शिक्षा करावी असा बेत बहुत दिवस त्याच्या मनी होता. आप्पा दाभोळेस गेले आहेत आणि सदू सुकडीचे माप घेण्यात मग्न आहे असे पाहून विसूने खुंटीवर आडवी ठेवलेली ठासणीची बंदूक उचलली. छर्रे, काथ्या अन् दारूचा बुधला हाती घेऊन तो चोंढ्याकडे धावला.

बांधावर पोचताच जेव्हा त्याने हुप्प्या आणि वानरी यांना सगळ्या वालांची नासाडी करताना पाहिले, तेव्हा दात खात त्याने बुधल्यातली दारू बंदुकीच्या नळीत घातली, वर छर्रे घालून काथ्या खुपसला अन् ठासठासून बार पक्का केला.

तो बंदूक उचलणार एवढ्यात शितू त्याच्याजवळ आली, अन् म्हणाली, "विसूदादा, वानरांना मारू नका."

"तू ऐक! काही समजत नाही तुला. हुप्प्यांनी गावाला उच्छाद आणलाय." स्वस्थपणे वालाचा राहळा तोडून तोंडात खुपसणाऱ्या हुप्प्यावर त्याने नेम धरला.

बावरून ती पुढे धावली. नळीपुढे हात धरून ती विसूला वारू गेली. तोच त्याने घोडा ओढलान. तिच्या तळहातातून दोन छर्रे पलीकडे निघून गेले.

"आई ग...... विसूदादा...." अशी किंकाळी फोडून तिने हात झाडला. भळाभळा रक्त वाहू लागले. तोंडात मारल्यासारखा विसू तिच्याकडे पाहत उभा राहिला.

रडत रडत शितू म्हणाली,

"विसूदादा, आता माझा शब्द मोडणार नाही, असं वचन द्या."

"दिलं" असे पुटपुटत ताळ्यावर येऊन विसूने टर्रकन सदरा फाडला अन् तिच्या हाताभोवती गुंडाळला.

"घरी चल," विसू म्हणाला. आता काय होईल ते निधड्या छातीने सोसायला तो तयार झाला.

आप्पा दाभोळेहून नुकतेच येऊन ओटीवरल्या झोपाळ्यावर टेकले होते. त्यांनी विसूने टाकलेला बार ऐकला होता.

हातातून रक्त वाहणारी शितू अंगणाच्या पायऱ्या उतरताना दिसली. तसे घाबरून तिच्याकडे धावत ते म्हणाले,

"काय केलंस पोरी? विसू कुठं आहे ? हातात छर्रे घुसले की..."

तिच्या पाठोपाठ विसू पायऱ्या उतरत होता. तो सगळे सांगण्याच्या अवसानात पुढे झाला. तोच शितू म्हणाली,

"नाही! हुप्यानं हात फोडला!"



**प्रश्न :**

खालील प्रश्नांची प्रत्येकी तीन ते चार वाक्यांत उत्तरे लिहा.

१. शितूला अत्यानंद केव्हा झाला ?

२. शितूच्या डोळ्यांत पाणी का आले ?

३. वानरांना शिक्षा करावी असा विचार विसूच्या मनात का आला ?

४. शितूने बंदुकीच्या नळीसमोर का हात धरला ? त्याचा परिणाम काय झाला ?

५. शितूने आप्पांना 'हुप्प्यानं हात फोडला' असे का सांगितले ?

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. असे कोण, केव्हा, का म्हणाले ?

अ. "आज विसूला काम कसं सुचलं ?"

आ. "माझा शब्द मोडणार नाही, असं वचन द्या."

२. आपल्या परिसरातील एका निरक्षर व्यक्तीस शिकवून साक्षर करायचे आहे. त्या व्यक्तीला शिक्षणाचे महत्त्व कसे पटवून द्याल ? थोडक्यात लिहा.

३. या पाठात आलेल्या प्रादेशिक शब्दांची यादी तयार करा व त्याचे अर्थ आपल्या शिक्षकांकडून समजावून घ्या.

**व्याकरण :**

- **क्रियापद-विध्यर्थ**

विसूदादाने खूप शिकावे.

या वाक्यातील 'शिकावे' या क्रियापदावरून बोलणाऱ्याचा हेतू आज्ञा करण्याचा नसून कर्तव्य, इच्छा व्यक्त करण्याचा आहे. 'कर्तव्य' यालाच 'विधी' असे दुसरे नाव आहे. त्यावरून त्याला **विध्यर्थ** असे म्हणतात.

- **क्रियापद-संकेतार्थ**

शितू चिकूच्या झाडापासून बाजूला झाली नाही, तर तिच्या अंगावर मुंगळे पडतील.

वरील वाक्यातील क्रियापदावरून एक गोष्ट दुसरीवर अवलंबून आहे, अशा प्रकारचा बोध होतो. या प्रकारची अट म्हणजे संकेतार्थ होण्यास दोन वाक्ये लागतात व ती जर-तर या अव्ययांनी जोडलेली असतात. व्याकरणात याला **संकेतार्थ** असे म्हणतात.

**अभ्यास :**

पुढील वाक्यांतील क्रियापदांचे अर्थ ओळखा.

१. शितूने आप्पांना खोटे सांगू नये.

२. अक्षरे काढायची, तर शितूला मिणमिणता उजेड तरी हवाच.



# ७. मित्र

**ना. सी. फडके** (नारायण सीताराम फडके: १८९४-१९७८) मराठी साहित्यातील श्रेष्ठ कादंबरीकार, कथाकार, लघुनिबंधकार. 'दौलत', 'प्रवासी', 'जादूगार', 'अटकेपार' इत्यादी कादंबऱ्या; 'नव्या गुजगोष्टी', 'धूम्रवलये' इत्यादी लघुनिबंधसंग्रह; 'प्रतिभासाधन', 'प्रतिभाविलास' इत्यादी समीक्षाग्रंथ प्रसिद्ध. भारत सरकारने 'पद्मभूषण' हा किताब देऊन त्यांचा गौरव केला आहे.

'मित्र' हा पाठ व्हीनस प्रकाशन,पुणे यांनी छापलेल्या 'गुजगोष्टी' या पुस्तकातून घेतला आहे. खरा मित्र कसा असतो, त्याचे गुणधर्म काय असतात, दीर्घ काळ सहवास लाभलेल्या व्यक्तीस मित्र म्हणता येईल का? या संबंधीच्या गोष्टी रोचक शब्दांतून या पाठात सांगितल्या आहेत.

या जगात बहुतेक प्रत्येकजण पुरेसा पैसा जवळ नाही म्हणून, किंवा पुरेसा कपडालत्ता नाही म्हणून, किंवा पुरेसे ग्रंथ वाचावयास मिळत नाहीत म्हणून तक्रार करत असतो; पण पुरेसे मित्र मिळत नाहीत, म्हणून दुःखीकष्टी झालेला एक तरी माणूस दिसतो का ? अमुक इतकी संपत्ती आपल्याला साठवली पाहिजे अशी महत्त्वाकांक्षा प्रत्येक मनुष्याने मनाशी ठरवलेली असते व तेवढी संपत्ती जोपर्यंत मिळत नाही, तोपर्यंत त्याचा जीव सुखी नसतो; पण असे कोणी कधी मनाशी म्हटले आहे का, की मला पाच मित्र जोडलेच पाहिजेत आणि ते जोपर्यंत मला लाभत नाहीत तोपर्यंत मला हे जीवित नीरसच वाटेल! आपल्याला दोन मित्र असले काय, आणि काही प्रसंगांमुळे त्या दोहोंचे दहा झाले काय, आपण सारख्याच संतुष्ट वृत्तीत असतो. मित्र वाढले त्या मानाने आयुष्याची रमणीयता वाढली असे होत नाही. दोनच मित्र असले तरी कोणी असे हळहळत नाही, की केवढे हे माझे दुर्भाग्य! परमेश्वरा, मला आणखी स्नेह्यांचा लाभ होणार नाही काय? आणि ज्याला दहा स्नेही आहेत तोही कधी मिजाशीत नसतो, की दुनियेला जे लाभले नाही ते मला लाभले आहे.

मित्रांची संख्या फुगली काय किंवा रोडावली काय, आपले सुखदुःख असते तेवढेच असते. आहेत तेवढ्या मित्रांवर प्रत्येकजण संतुष्ट आहे. किती विचित्र हे!

याचे कारण असे, की मित्र या शब्दातील खरे मर्म फारच थोड्या लोकांच्या अनुभवाला आलेले असते. बहुतेक लोक खऱ्या मैत्रीच्या प्रत्ययाला मुकलेले असतात व प्रत्ययावाचून मित्र हा शब्द ढिलेपणाने सहसा वापरत असतात. एखाद्याचा अधिक सहवास झाला, की लगेच त्याचा मित्र म्हणून उल्लेख करण्यात येतो. जणू काय मैत्री हे सहवासाच्या वेलीला हमखास येणारे फळच आहे! खरे पाहता सहवास व मैत्री यांच्यात अन्योन्याश्रय फारच थोडा आहे. वाढत्या सहवासाबरोबर मित्रभाव परिपक्व व मधुर होत जातो यात संशय नाही; परंतु सहवास वाढला, की त्या मानाने स्नेह उत्पन्न झालाच पाहिजे असे समजणे म्हणजे, जाईची वेल मांडवावर पोचण्याइतकी वाढली, की तिला बहर आलाच पाहिजे असे म्हणण्यासारखे आहे. पुष्कळदा वेल मांडवभर पसरली तरी फुलत नाही, तद्वत वर्षानुवर्षे सहवास घडूनही खरा मित्रभाव उद्‌भवत नाही आणि नुसत्या सहवासालाच लोक मैत्री समजत असतात. किती भ्रामक समजूत आहे ही! ज्यांनी वीस-पंचवीस वर्षे एकाच कचेरीत शेजार-शेजारच्या टेबलावर कारकुनी केली, अशा दोन माणसांत गाढ मैत्री आहे, असे निश्चयाने म्हणता येईल काय? इतका वर्षानुवर्षांचा सहवास घडूनही त्या दोन व्यक्तींत परस्पर आकर्षण व सहानुभूती उद्‌भवली नसण्याचाच संभव अधिक नसतो काय? तसे कशाला, ज्यांचे व आपले लहानपण एकाच ठिकाणी गेले, ज्यांच्याशी मिळून-मिसळून खेळता खेळता आपण लहानाचे मोठे झालो आणि जे व आपण एकाच शाळेत शिकलो सवरलो, त्यांना आपण बालमित्र म्हणतो व जगाची अशी समजूत असते, की बालमित्र म्हटला, की तेथे मित्रत्वाची पराकाष्ठा झाली. या कल्पनेने बालमित्र किंवा लंगोटीमित्र ही अगदी जिव्हाळ्याची संज्ञा समजली जाते; पण बालमित्रांशी हा जिव्हाळा खरोखरच असतो काय? मोठेपणी बालमित्र एके ठिकाणी आले, की एकमेकांना 'अरे, जारे' अशा एकेरी नावाने संबोधून बोलतात हे खरे व ज्यांच्याशी सारे लोक मोठ्या अदबीने वागतात अशा मोठ्या माणसांना कोणी 'अरे, जारे'

म्हटलेले ऐकले की तिऱ्हाईत माणसांना तो एक विशेष कौतुकाचा प्रकार वाटतो हेही खरे; पण यापलीकडे बालमित्रांचे परस्परांशी जे वर्तन होते, त्यात काही माधुर्य असते काय ?

ते नसणेच निसर्गसिद्ध आहे. बालपणी जे एकत्र खेळले-सवरले त्यांनी पुढे अगदी भिन्न मार्गांनी क्रमण केलेले असते, त्यांच्या ठिकाणी परस्परविरुद्ध आवडी-निवडी उत्पन्न झालेल्या असतात, त्यांची अंतःकरणे भिन्न भिन्न नाजूक बंधनांत सापडलेली असतात. एखाद्या दरीत ध्वनीचा प्रतिध्वनी घोटाळत राहावा, त्याप्रमाणे त्यांच्या बालपणातील सहवासाची आठवण तेवढी रेंगाळत राहिलेली असते व त्या स्मृतीबद्दल निष्ठा दाखवण्याच्या आविर्भावानेच ते एकमेकाला एकेरी रीतीने संबोधतात. वर्षाकाळी जेथून पाण्याचे ओहोळ वाहिले त्या खडकावर पुढे फक्त एक रेष उमटलेली दिसत राहावी, त्याप्रमाणेच आपले आपल्या बालमित्रांशी होणारे सलगीचे वर्तन असते. ते दिसावयास सलगीचे दिसते, पण त्यात खऱ्या मित्रभावाचा मागमूसही नसतो. बालमित्रांविषयी जो आपण आत्मभाव दाखवतो, त्यात केवळ एक रूढी पाळण्यापलीकडे आपली बुद्धी क्वचितच असते. सारांश, सहवास आणि मैत्री यांचा निश्चित कार्यकारणभाव मानता येणार नाही. मैत्री ही स्फुल्लिंगासारखी आहे. ती केव्हा प्रकट होईल हे सांगता येत नाही. कित्येक वर्षांच्या सहवासात ती अप्रकट राहील, अत्यल्प सहवास घडलेला असूनही ती प्रकट होऊन दोन अंतःकरणे प्रदीप्त करील.

सहवासालाच मित्रभाव समजण्यात जशी लोकांची चूक होते, तशीच त्यांची दुसरी एक चूक होत असते. मित्र म्हटला, की तो सदैव आपली प्रशंसा करणाराच असला पाहिजे, अशी सामान्य कल्पना असते; पण मैत्री म्हणजे प्रशंसेचा निरंतर झरा समजणे कितपत बरोबर आहे? माणसाला प्रशंसाच हवी असली तर ती मिळवणे काही कठीण नाही. चार पैसे टाकून प्रशंसा बाजारात खरेदी करता येत नाही हे खरे; पण रुपेरी चाबकाने कोणतेही घोडे वठणीवर येते, या न्यायाला प्रशंसा काही अपवाद नाही. चार पैसे आपल्याजवळ असले तर प्रशंसक भोवताली सहज जमतात. पैसा, सत्ता व कला असल्या बळावर स्तुतिपाठकांचा वाटेल तेवढा तांडा जमा करता येतो. धनिकाभोवती, राजाभोवती किंवा कीर्तिसंपन्न झालेल्या नटाभोवती खुशमस्करे किती असतात पाहा !पण,

हे खुशामस्करे म्हणजे त्यांचे मित्र का म्हणायचे? ते सारखे मधुर भाषण करत असतात मधाच्या पोळ्यातून थेंब गळावे त्याप्रमाणे त्यांच्या शब्दांतून प्रशंसा गळत असते; पण मधुप्रलापी सहस्र प्रशंसकांच्या गराड्यात वावरणारा राजा, धनिक किंवा नट खऱ्या मित्रभावाचे एखादे तरी शीतल स्नान आपल्याला मिळेल का म्हणून जेव्हा पाहतो, तेव्हा त्याला सारे जग तप्त, रुक्ष अरण्याप्रमाणेच बहुतकरून भासते.

प्रशंसा व मित्रभाव या भिन्न गोष्टी आहेत. योग्य वेळी खरा मित्र प्रशंसा करील हे सांगावयासच नको आणि खऱ्या मित्राकडून मिळालेल्या प्रशंसेच्या शब्दाचीच काय, पण नुसत्या दृष्टिक्षेपाची सर दुसऱ्या कसल्याही पारितोषिकाला येणे शक्य नाही हेही खास; परंतु कारण नसताना प्रशंसा करणे हा खऱ्या मित्राचा धर्मच नव्हे. वीणेच्या तारांवरून केव्हाही बोट फिरवले तरी त्यातून आपल्याला आल्हाद देणारा मधुर नादच निघतो; पण खऱ्या मित्राच्या हृदयाच्या तारा अशा नसतात. आपण सत्कृत्य केले, तर त्या तारांतून गौरवाचे गोड शब्द निघतील, पण आपण चुकत असलो, तर अनुशासनाचा गंभीर शब्द त्यातून निघाल्याखेरीज राहणार नाही. सदासर्वदा नम्र भाषणांनी रिझवणे हे मित्राचे कार्य नाही. आपले चुकते पाऊल जो फिरवतो आणि जाणारा तोल जो सावरतो तोच आपला खरा मित्र होय. मित्र म्हणजे केवळ आपल्या जीविताचे अलंकार नव्हेत, आपल्या जीवितप्रवाहाला योग्य वळण देणारे ते तट आहेत. काजव्यांचे थवेच्या थवे जर आपल्याला दिसले, तर त्यांची शोभा मोठी रमणीय वाटल्यावाचून राहत नाही; पण त्या शोभेचा उपभोग घेण्यासाठी आपल्याला अंधकारात राहावे लागते. वाममार्गाच्या अंधारात टाकून केवळ आपल्याला क्षणभर सौख्य देणाऱ्या या काजव्यांप्रमाणे खरे मित्र नसतात. खरा मित्र सूर्यासारखा असतो. त्याच्या सान्निध्यात असताना पूर्ण प्रकाशात असल्याचा भरवसा आपल्या मनाला वाटत असतो व त्याच्या साक्षीने वावगे कृत्य करण्याची आपल्याला शरमच वाटते. म्हणूनच सूर्याला 'मित्र' म्हणतात की काय कोण जाणे! त्या त्या प्रसंगी सुमधुर प्रशंसा, धीरगंभीर शब्द, प्रेमळ उत्तेजन, सहानुभूतिमय सांत्वन आणि कठोर उपदेशवाणी ज्याच्याकडून लाभते तोच खरा मित्र होय. आपल्याला

## निसर्गचित्र

❑ चित्रकार : श्री. नांगरे, पुणे

निसर्गाची सुंदर रूपे आपण नेहमी पाहतो. सूर्योदय व सूर्यास्त, निळे आकाश, हिरवे डोंगर, संथपणे वाहणाऱ्या नद्या, शांत जलाशय, माळावरील घरे, झाडे व वेली, हिरवळीचे गालिचे यांसारखी दृश्ये पुन्हा-पुन्हा पाहतानाही आपणांस खूप आनंद वाटतो. वेगवेगळे रंग, निरनिराळे आकार, ऊन-सावल्यांचा खेळ आणि त्या त्या दृश्यांची ठेवण हे सगळे आपण डोळ्यांनी पाहतो व मनात जपून ठेवतो. चित्रकार अशी सुंदर निसर्गदृश्ये आपल्या चित्रांतून कायमची जतन करतो.

अशाच प्रकारचे हे एक सुंदर निसर्गचित्र चित्रकार श्री. नांगरे यांनी रेखाटले आहे. त्यात नदीच्या एका काठावरून पलीकडच्या काठाचे दिसणारे विस्तृत निसर्गदृश्य रंगवलेले आहे. नदीप्रवाह व त्यात झाडांच्या पडलेल्या फिक्या सावल्या, गडद काळसर तपकिरी छटांचा मऊशार पैलकाठ, त्याला लागूनच असलेली हिरव्या रंगछटांची चढण, पलीकडची गडद वनराई हे भाग डोळ्यांत भरतात. ऐलपैल काठांच्या माथ्यावरील सारख्याच उंचीचे आकाश व समान उंचीच्या वनराई यांमुळे या चित्राला एक पक्की चौकट प्राप्त झाली आहे. होडी व जवळची उभी माणसे यांमुळे पुढील बाजूनेही रेखीव बंदिस्तपणा लाभलेला आहे.

नदीप्रवाहातील पाण्याची मंद निळसर रंगछटा प्रकाशमान करून उठावदार केली आहे. हे निसर्गचित्र फुलांच्या गुच्छाप्रमाणे आहे. यातील प्रत्येक भागाच्या रंगरेषा एकवटूनच एका सलग रेखीव निसर्गदृश्याला साकार करतात. निसर्गचित्र निसर्गाच्या रूपांचे असे एकात्म दर्शन घडवते. यांसाठी नाजूक, हलके, तजेलदार व भावनास्पर्शी जलरंग अधिक परिणामकारक ठरतात. कागदाच्या पांढऱ्या भागाचा प्रकाशासारखा उपयोगही करता येतो. मोजक्या फिकट-गडद रंगछटांनी निसर्गचित्र प्रभावी ठरते.

या निसर्गचित्रात हिरव्या रंगाच्या गडद-फिक्या रंगछटांची, नदीप्रवाहाच्या प्रसन्न चैतन्याची आणि विशाल आकाशाची एक रेखीव रचना चित्रकाराने केलेली आहे. या रचनेत व तिच्यातून जाणवणाऱ्या नेत्रसुखद व प्रसन्नदायक अनुभवातच या चित्राचे खरे सौंदर्य आहे.

— प्रा. रा. ग. जाधव

सुखवण्याच्या वेळी तो कुसुमाहून मृदू असतो आणि आपल्याला जागृत ठेवण्याच्या वेळी तो वज्राहून कठीण होतो.

खरे मित्र शोधून काढू म्हटल्याने सापडत नाहीत, किंवा अमक्या रीतीने त्याची वाट पाहत राहिले, की ते आपल्याला येऊन भेटतात असेही नाही. मृगोदरातील कस्तुरीसारखाच त्यांचा वास असतो, पण तितकेच ते दुर्मिळ असतात. आपल्या उत्कट प्रीतीचा बाण अचूक लागून ते केव्हा मिळतील तेव्हा मिळतील! ते ज्यांना मिळतात त्यांचे भाग्य अलौकिक समजावे! मात्र, त्यांचा लाभ आपल्यालाही घडेल या आशेत आपल्यापैकी प्रत्येकाने का नसावे? समुद्रात शिंपल्यांनी सदा आशेने उन्मीलित असावे हे बरे. कारण, स्वातीच्या जलधारा केव्हा पडतील आणि जलबिंदू शिंपल्यांत शिरून त्यांची मौक्तिके केव्हा होतील याचा काय नियम?

**प्रश्न :**

खालील प्रश्नांची प्रत्येकी थोडक्यात उत्तरे लिहा.

१. आहेत त्या मित्रांवर संतुष्ट असणे हे लेखकाला विचित्र का वाटते?
२. लेखकाच्या मते मैत्रीबाबत लोकांची कोणती समजूत भ्रामक असते?
३. बालमित्रांशी होणारे वर्तन सलगीचे दिसते, पण त्यात खऱ्या मित्रभावाचा मागमूसही नसतो, असे लेखकाने का म्हटले आहे?
४. खऱ्या मित्राची कोणती लक्षणे लेखकाने या निबंधात सांगितलेली आहेत?

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. खालील वाक्यांचा अर्थ स्पष्ट करा.
   अ. मैत्री ही स्फुल्लिंगासारखी आहे.
   आ. कारण नसताना प्रशंसा करणे हा खऱ्या मित्राचा धर्मच नव्हे.
   इ. खरा मित्र सूर्यासारखा असतो.
२. खालील शब्दांचे अर्थ सांगून त्यांचा स्वतःच्या वाक्यांत उपयोग करा.
   पराकाष्ठा, खुशमस्करे, मधुप्रलापी, अनुशासन.
३. 'माझा आवडता मित्र' यावर वीस ते पंचवीस वाक्यांत निबंध लिहा.
४. 'नव्या गुजगोष्टी' हा ना. सी. फडके यांचा लघुनिबंधसंग्रह मिळवून वाचा.

**व्याकरण :**

दोन स्वर किंवा व्यंजने एकमेकांसमोर येऊन त्यांचा एक शब्द तयार होतो. याला **संधी** म्हणतात. वर्णाक्षरातील स्वर, व्यंजन आणि विसर्ग विचारात घेऊन त्यांचे तीन प्रकार पाडलेले आहेत. आता **स्वरसंधी** हा प्रकार समजावून घेऊ.

| क्रम | जोडशब्द | पोटशब्द | एकापुढे एक आलेले स्वर | संधी होऊन बनलेला स्वर |
|---|---|---|---|---|
| १. | वाचनालय | वाचन + आलय | अ + आ | आ |
| २. | विद्यार्जन | विद्या + अर्जन | आ + अ | आ |
| ३. | कवीश्वर | कवि + ईश्वर | इ + ई | ई |
| ४. | महींद्र | मही + इंद्र | ई + इ | ई |
| ५. | गुरूपदेश | गुरु + उपदेश | उ + उ | ऊ |
| ६. | भूद्धार | भू + उद्धार | ऊ + उ | ऊ |

वरील सर्व शब्दांत एकापुढे एक आलेले स्वर हे एकाच जातीचे म्हणजे सजातीय आहेत. त्यांचा संधी होऊन त्याच जातीचा एकच दीर्घ स्वर आला आहे. यावरून असे लक्षात येते, की दोन सजातीय स्वर एकापुढे एक आले असता त्यांचा संधी होऊन त्या दोहोंबद्दल त्याच जातीतील एकच दीर्घ स्वर येतो.

| क्रम | जोडशब्द | पोटशब्द | एकापुढे एक आलेला स्वर | संधी होऊन बनलेला स्वर |
|---|---|---|---|---|
| १. | भूपेश | भूप + ईश | अ + ई | ए |
| २. | रमेश | रमा + ईश | आ + ई | ए |
| ३. | अंत्योदय | अंत्य + उदय | अ + उ | ओ |
| ४. | धारोष्ण | धारा + उष्ण | आ + उ | ओ |
| ५. | एकोन | एक + ऊन | अ + ऊ | ओ |
| ६. | देवर्षी | देव + ऋषी | अ + ऋ | अर् |
| ७. | महर्षी | महा + ऋषी | आ + ऋ | अर् |

वरील सर्व शब्दांत एकापुढे एक आलेले स्वर, हे एकाच जातीचे नाहीत. ते विजातीय आहेत. येथे अ किंवा आ स्वरांपुढे इ, उ, ऋ (ऱ्हस्व किंवा दीर्घ) आले आहेत. त्यांचा संधी होऊन अनुक्रमे ए, ओ, अर् असे वर्ण तयार झालेले दिसतील. यावरून असे लक्षात येईल, की —

अ किंवा आ या स्वरांच्या पुढे इ, उ किंवा ऋ हे ऱ्हस्व किंवा दीर्घ विजातीय स्वर आले तर त्या दोन्ही स्वरांच्या बद्दल अनुक्रमे ए, ओ, अर् असे आदेश येतात. (आदेश म्हणजे एका वर्णाच्या जागी दुसरा वर्ण येणे.)

**अभ्यास :**

संधी सोडवा.

यथेष्ट, महोत्सव, अन्योक्ती, सप्तर्षी, ज्ञानेश्वर, वचनोक्ती, गौरवोद्गार, ब्रह्मर्षी, स्वेच्छा, विघ्नेश, संगमेश्वर, फलाहार, भानूदय, विद्यार्थी, भोजनालय, प्राणार्पण, मिष्टान्न.





# ८. दावं

**शंकर पाटील** (शंकर बाबाजी पाटील: १९२६ - १९९४) कथालेखक आणि चित्रपट-कथालेखक. ग्रामीण जीवनाच्या विविध अंगांचे दर्शन त्यांच्या कथांतून घडते. 'वळीव', 'आभाळ', 'भेटीगाठी', 'ऊन', 'धिंड' इत्यादी कथासंग्रह; ग्रामजीवनाचे चित्र रेखाटणारी त्यांची 'टारफुला' ही कादंबरी प्रसिद्ध आहे. 'वावटळ', 'भोळीभाबडी', 'पिंजरा', 'डोंगरची मैना', 'लक्ष्मी' इत्यादी मराठी चित्रपटांच्या कथा, पटकथा व संवाद त्यांनी लिहिले आहेत.

महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक मंडळात ते दीर्घ काळपर्यंत मराठी भाषेचे विशेषाधिकारी आणि विद्यासचिव म्हणून काम पाहत होते.

प्रस्तुत कथा 'शंकरकथा' या कथासंग्रहातून घेतलेली आहे. आपल्या वासरासाठी 'दावं' तोडून जाणाऱ्या गाईची ही कथा मानवी जीवनातील आईच्या मायेची महती सांगून जाते.

जुनी गोष्ट आहे — माझ्या लहानपणी घडलेली. तेव्हा मी सात वर्षांचा असेन. कारण पाडव्याच्या मुहूर्तावर नुकतेच शाळेत नाव घातले होते आणि मी इन्फंट्रीच्या वर्गात बसत होतो, हे आठवते.

त्या दिवसांत मला एक विरंगुळ्याचे ठिकाण होते, ते म्हणजे आमच्या जनावरांचा गोठा. तिथे तासन्‌तास माझे मन रमायचे. आमच्या घराला लागूनच हा गोठा होता. चांगली पंधरा-वीस जनावरे दावणीला होती. दोन बैलजोड्या, सहा म्हशी, दोन गाई आणि तीन-चार वासरे असा आटाला होता.

या गोठ्यात माझा एक सवंगडी होता. ज्या दिवशी माझे शाळेत नाव घातले, त्याच दिवशी पाडव्याच्या मुहूर्तावर तो जन्माला आला होता. आमच्या ढवळ्या गाईने एका नामी खोंडाला जन्म दिला होता. त्याचे नाव ठेवले होते सोन्या. हा सोन्या अगदी आपल्या आईसारखाच होता. काळाबाळा. त्याच्या काळ्या रंगावर ते पांढरे ठिपके फार उठून दिसायचे. त्या काळ्या रंगाला एक छान लकाकी होती. रंधा मारलेल्या शिसवी लाकडावर तेल लावावे तशी ती दिसायची. त्यावर ते पांढरेशुभ्र ठिपके फार शोभून दिसायचे. खोंड फार चलाख होता. जरा कुठे खुट्ट झाले, की लगेच कान टवकारायचा. त्याच्याकडे टुकुटुकु बघत राहावेसे वाटायचे. मी जवळ गेलो, की आपल्या

पुढच्या दोन पायांवर भार देऊन तो घाईघाईने उठून उभा राहायचा आणि आपली एवढीशी काटेरी जीभ काढून मी पुढे केलेल्या हाताला चाटू लागायचा. त्या स्पर्शातली ऊब मला अजून आठवते. लगळ करणारी ती इवलीशी जीभ अजून डोळ्यांपुढे येते. मग मी त्याच्या मानेखालची पोळी खाजवत उभा राहायचा. कोटाला मोठी बटणे लावावीत तशी दिसणारी त्याची ती नुकती उगवणारी शिंगेही मला मोहीत करायची. बोटांनी दाबले की ती मऊ लागायची आणि त्याची गंमत वाटायची. या सोन्याच्या गळ्यात गळा घालून मी तास्न्‌तास त्या गोठ्यात रमून जायचा.

सोन्याची नि माझी छान गट्टी जमली होती. एक दिवस असा आला, की माझ्या या सगळ्या आनंदावर विरजणच पडले. दावणीचे बैल सोडून आमच्या या सगळ्या जनावरांना वडलांनी राखोळी लावली. दहा-बारा वर्षांचा एक पोरगा रोज सकाळी येऊन गोठ्यातली ही जनावरे घेऊन जायचा आणि संध्याकाळी दिवस मावळायला परत आणायचा. आमच्या गावाला लागून कडमकाईचा एक डोंगर होता. त्या डोंगराच्या आसपास अनेक ओढे-नाले होते. दूरवर माळ पसरलेला होता. मृग चांगला पडून गेला म्हणजे ओढे-नाले यांच्या दोन्ही काठांना चांगले हिरवेगार गवत उगवायचे आणि डोंगराच्या पायथ्याला पसरलेला माळ हिरवागार गालिचा पसरावा तसा दिसायचा. गावची जनावरे दिवसभर या माळावर चरत असायची. राखोळी घातली, की घरची वैरण



कमी लागायची. आमची जनावरेही दिवसभर या माळावर चरायला जाऊ लागली आणि दिवस-दिवसभर गोठा रिकामा, भकास, उदास दिसू लागला. उगवलेला दिवस लवकर मावळेनासा झाला. जनावरे संध्याकाळी कधी परत येतात आणि माझा सोन्या मला कधी दिसतो असे होऊन जायचे. ही जनावरे कधी दिवसाबरोबर यायची तर कधी दिवस मावळून कडूसं पडल्यावर यायची.

एकदा दिवस मावळला तरी जनावरे परतली नव्हती. सोन्याची वाट बघत मी उंबऱ्यातच बसलो होतो. एवढ्यात आईने कशाला तरी हाक मारली. मी आत गेलो. ती दिवाबत्तीची तयारी करत होती. कंदिलाची काच पुसता पुसता ती म्हणाली, ''बाबा, त्या डब्यातले बाटलीभर राकेल तेवढं काढुन घे.''

मी या कामाला लागलो आणि बाहेरच्या अंगणातून राखोळीच्या पोराची हाक आली, ''पाटलीणबाई, जनावरं आली हो! सगळी दावणीला बांधा. मी



जातो हो!" बसल्या जागेसनंच आई मोठ्याने म्हणाली, "जा बाबा, जा. बांधतो आम्ही."

ही साद ऐकताच सोन्याला बघण्यासाठी हातातलं काम तिथेच सोडून मी धावत बाहेर गेलो आणि पळतच गोठ्यात शिरलो. दिवसभर चरून, पोटे टुम्म करून आलेली जनावरे आपापल्या जागेवर जाऊन शांतपणे दावणीला उभी होती. कोणी डोळे झाकून रवंथ करत होती. माझा सोन्या मात्र मला तिथं कुठंच दिसत नव्हता. 'सोन्या' 'सोन्या' अशा हाका मारूनही बघितल्या. एका हाकेला धावत येणारा सोन्या कुठे गडपच झाला होता. सबंध गोठा मी तीन-तीनदा पाहिला. चाऱ्याजवळचा आडोसाही बघितला. सोन्या गोठ्यात नाही हे बघून छातीत धडधड सुरू झाली. बाहेरच कुठे रेंगाळलाय का, हे तरी पाहावे म्हणून मी घाईने गोठ्यातून बाहेर आलो. आजूबाजूला बघू लागलो. एवढ्यात आई जवळ येऊन म्हणाली, "काय रं बाळा, आचारी का बिचारी होऊन असा का बगत ऱ्हायलाईस ?"

घाबऱ्या आवाजात मी म्हणालो, "अगं आई, आपला सोन्या गोठ्यात ऱ्हाई!" तीही आचारी का बिचारी झाली. एवढ्यात सोन्याची आईही हंबरू लागली. त्या हंबरणाऱ्या गाईकडे बघत आई म्हणाली, "बाई, असं कुठं ठेवून आलीस ग तुझ्या लेकराला? कशी इसरलीस त्याला?" आणि माझ्याकडे वळून बघत ती म्हणाली, "बाबा, चल, आजूबाजूच्या गल्लीबोळांत कुटं हाय का बगू."

आजूबाजूचे सगळे बोळ आणि गल्ल्या फिरून आलो. पाक सबंध गाव आम्ही पालथे घातले. वरावरा सगळीकडे हिंडून परत माघारी आलो. त्या गोठ्याकडे बघवत नव्हते. गाय एकसारखी हंबरत होती. आपल्या सोन्यासाठी टाहो फोडत होती. काय करावे हे आम्हांलाही कळत नव्हते. मी रडकुंडीला येऊन दाराच्या एका पायरीवर गप बसून राहिलो. आईही अंगणात उभी राहून ज्याला त्याला सांगू लागली.

बघता बघता ही बातमी गावभर झाली. पाच-पन्नास लोक घरापुढे गोळा झाले. सांगावा मिळताच आमचे अप्पाही मळ्यातून घराकडे आले. घरात न जाता बाहेर पायरीवरच बसले. ढग गडगडावा तसे ते गरजले, "जनावरं आल्या आल्या सगळं नीट बगायचं ऱ्हाई का? त्या पोराला विचारायचं ऱ्हाई —कुटं हाय वासरू म्हणून?"

यावर आई कशीबशी म्हणाली, ''येऊन बगुस्तोवर पोरगं गेलं आणि मग कुनाला इचारायचं ?''

''इचारा आता आमच्या कर्माला!'' असा ताव काढत ते आईवर पुन्हा खेकसले आणि मग आमच्या एका गड्याला म्हणाले, ''चंद्राप्पा, जा रं त्या राखोळीच्या पोराला घेऊन ये.''

दारापुढचे अंगण माणसांनी भरले होते. ''जातोय कुठं ? सापडंल... कुटंतरी चुकलं असंल,'' असे म्हणून लोक धीर देत होते. एवढ्यात राखोळीचा पोरगा आला. त्याच्या पाठोपाठ त्याची आई, आज्जी असे सारे लटांबर आले होते.

त्याला बघितल्या बघितल्या वरच्या पट्टीत सूर लावून अप्पांनी विचारले, ''व्हय रे ह्यचंद्र्या, ही कसली राखन तुझी ? कुटं गेला रं खोंड आमचा ?''

अप्पांच्या आवाजानेच ते गार झाले. त्याच्या तोंडातून शब्दच फुटेनासा झाला. हातपाय थरथर कापायला लागले. मग त्याची म्हातारी आजीच धीर करून म्हणाली, ''नका जी पाटील त्याच्यावर तावदारू. ते पैलंच भिऊन गाबागाब झालंय.''

अप्पा उसळून बोलले, ''तावदारू नगो तर काय मग, त्याच्या तोंडावरनं हात फिरवून इचारू... व्हय रे, माझ्या लेकरा बाळा, असं बोलू व्हय म्हातारे ?''

यातून काही निष्पन्न होईना हे पाहून एकजण म्हणाला, ''हे बगा पाटील, हे एरंडाचं गुऱ्हाळ काय फायद्याचं ?''

अप्पांनी विचारले, ''मग करूया तर काय म्हणता ?''

''असं करू—गावातनं दोन बत्त्या घेऊ, ह्या पोरालाबी संगट घेऊ आणि कुटं कुटं चरायला गेल्ती त्यो माळ सगळा पालथा घालून येऊ.''

ह्याला दुजोरा देत दुसरा एकजण म्हणाला, ''व्हय जातंय कुटं ? पार सगळा माळन्‌माळ ढवळू की.''

अप्पांना ही गोष्ट पटली. मग वेळ न लावता गडी पाठवून दोन तिथे चार बत्त्या मागवल्या आणि रात्री आठच्या सुमाराला पन्नास-पाऊणशे लोक सोन्याला बघायला माळाकडे निघाले. 'मी येऊ का बरोबर', असे विचारले तर नको म्हणतील... 'अंधारात तुझं आणि तिथं काय गटळं पुरलंय ?' असे विचारतील, हे लक्षात घेऊन अप्पांच्या ध्यानात येणार नाही अशा बेताने मी त्या गर्दीत घुसलो. कुणाच्या तरी आडाआडाने चालत राहिलो.

गाव मागे राहिले. अंधारात बुडून गेले. बत्तीच्या उजेडात आम्ही माळावर

आलो. बघावे तिकडे आभाळागत पसरलेला माळ तुडवावा तितका थोडाच होता. राखोळीचा पोरगा म्हणेल तिकडे जात होतो. रात्री आठचे नऊ झाले, नऊचे दहा झाले. पाक सारा माळ तुडवून कडमकाईच्या डोंगराजवळ आलो. एक भला मोठा राक्षस अंधारात मांडी घालून बसावा तसा तो डोंगर दिसत होता.

रात्रीचे अकरा वाजून गेले. डोंगराच्या पायथ्याला पसरलेला माळ सगळा पालथा घालून झाला. सगळ्यांचीच निराशा झाली. मग एके जागी बसून थोडा वेळ खल केला आणि ओढ्यावगळीने तपास करत जायचे ठरले. काहीजण ओढा बघत निघाले. काहींनी ओहळ धरले, त्यांच्या काठाकाठाने आम्ही जाऊ लागलो आणि एकाएकी माझ्या अंगावर काटा उभा राहिला. नकळत माझ्या तोंडातून किंकाळी बाहेर पडली.

एकाएकी ती किंकाळी ऐकून सगळे घाबरून घट्ट झाले. काय झाले, काय झाले करत सगळेच माझ्याकडे धावले. गच्च डोळे मिटून आणि तोंड कुणाच्या तरी धोतराच्या सोग्यात खुपसून मी कसाबसा बोललो, "तिथं कोणतरी बसलंय!"

"अरं, कुटं? काय? कोण बसलंय?" असे लोक विचारायला लागले. बरोबर अंदाज करत कुणीतरी म्हणाले, "अहो, हे बगा. ह्या वाखफड्याच्या गड्ड्याला बगून भ्याला असंल."

हे ऐकून जरा धीर आला.

हळूच डोळे उघडून बघितले, तर खरोखरच वाळलेल्या वाखफड्याचा एक भला मोठा गड्डा मला दिसला आणि मनावरचे दडपण गेले. हे दडपण गेले आणि दुसरे आले.

एके ठिकाणी गर्दी झालेली बघून बाजूच्या दुसऱ्या ओहळातून चाललेले आमचे अप्पा आणि त्यांच्याबरोबरचे दहा लोक धावत आमच्याकडे आले. मला बघून अप्पा चपापले. काय बोलावे हे त्यांनाच कळेनासे झाले. ते मला म्हणाले, "तू रं कसा?"

काही न बोलता मी गप्पच उभा राहिलो. तोंड उघडून बोलणार काय?

मग पुन्हा त्यांनीच विचारले, "अरं, मला एक कळू न देता गुपचूप आलाईस. तुझ्या आईला तर सांगून आलाईस का?"

न बोलता मी नुसती नकारार्थी मान हलवली आणि कपाळावर हात मारून अप्पा म्हणाले, "काय इदर कल्याणी पोरगं रं तू! मला एक न्हाई ते न्हाई,

निदान घरात आईला तर सांगून यायचं न्हाई? अरं, तू आणि कुठं गडप झालास म्हणून काळजी करत बसली असंल की ती!"

मध्येच कुणीतरी भर घालत म्हणाले, "अहो, आईचं आतडं हाय ते! काळजी करणार तर! साधी न्हाई, हराणकाळजी!"

आणि बत्तीच्या उजेडात खाली वाकून माझ्या पायांकडे बघत अप्पा म्हणाले, "पोरा, हे रं काय? पायांत काही न घालता अनवाणी आलाईस? एवडं काय लागलंय पायाला? रगात बग ते." आणि लोकांकडे बघून म्हणाले, "टिक्कीचा पाला कुटं दिसतोय काय बगा."



मग कुणीतरी टिक्कीचा पाला आणून त्याचा रस माझ्या त्या अंगठ्यावर पिळला. त्या पाल्याचाच लेप त्याच्यावर बसवला. एवढा उपचार झाला आणि मग माझ्याकडे पाठ करून खाली बसत अप्पा म्हणाले, "बाबा, बस पाठकुळीवर. झालं एवढं रग्गड झालं! चला, आता गप घरला जाऊ."

मी मुकाट्याने पाठकुळीवर बसलो. सगळ्यांचाच हिरमोड झाला होता. एवढे हिंडल्याचा काही फायदा झाला नव्हता. सगळेच अबोल होऊन पाय उचलत होते.

मध्यानरात्र उलटल्यावर आम्ही घरी आलो. आई, अक्का, मावशी आणि शेजारच्या चार बाया डोक्याला डोकी लावून अंगणात बसून होत्या. आम्ही जवळ आलो आणि आईचा हुंदका कानावर आला.

अप्पा म्हणाले, "काय झालं काय? असं का हे?" कशीबशी उठून आई म्हणाली, "जरा चला की गोठ्यात, बगा चला. सोन्या गावला न्हाई न्हवं?" काही न बोलता आईबरोबर आम्ही गोठ्यात गेलो. सगळीकडे दूध पसरून गोठा सगळा दुधाने पांढरा दिसत होता.

अप्पांनी विचारले, "दूध सांडलं व्हय?"

आणखी एक हुंदका देऊन आई म्हणाली, "कशी असती आईची माया बगा. दूध कुठलं सांडतंय? अहो, सोन्याच्या आईचा पान्हा हाय ह्यो! आपोआप सडांतनं धारा गळाल्यात."

एकाएकी अप्पांनी विचारले, "अगं पर दावणीची गाय कुटं हाय?"

"बगा की कशी दावं तोडून पळून गेलीया! हंबारली, हंबारली आणि एकाएकी गप्पच झाली... हे बया. आवाज का ईना म्हणून गोठ्यात जाऊन बघते, तर हे असं दिसलं."

दावणीचे ते तुटके दावे हातात घेऊन चुकचुकल्यागत करत अप्पा म्हणाले, "काय म्हनायचं तर काय ह्याला? अंगठ्याएवढं दावं तोडून ती पळाली तर कशी असंल?"

झोका दिल्यागत एक हात हालवून तो माझ्या तोंडाजवळ आणला आणि माझ्या गालाचा एक गचवाटा घेत आई म्हणाली, "अहो, मायाच असती आईची तशी! ह्या लेकरास्नी काय हाय त्याचं? बगा कसा पाठकुळीवर बसलाय निवांतपणी? उतर उतर माझ्या काळा! अरं, सांगून जायचं न्हाई?" असं म्हणून तिनं उचलून मला पोटाशी धरले आणि हपापल्यागत माझ्या तोंडावरून

हात फिरवत म्हणाली, "अरं, घाबरून घट्ट झाले हुते की रं मी हिकडं! म्हणलं, तू आणि कुठं बेपत्ता झालास? एक सोडून सात पीळ पडलं की रं माझ्या आतड्याला! ठरीवलतं आता तुझ्यासंगं बोलायचंच न्हाई. पर न्हाई रं माझं मन तेवडं घट्ट! माझ्या सोन्या!"

मला भडभडून आले. एकाएकी डोळे डबडबले आणि कसाबसा 'आई' म्हणून मी तिच्या गळ्यात पडलो आणि कितीतरी वेळ आम्ही दोघेही मुसमुसून रडत राहिलो आणि अचानक समोर पाहतो, तर गळ्यातलं दावं तुटलेल्या स्थितीत वासरासह गाय अंगणात उभी !

**प्रश्न :**

खालील प्रश्नांची प्रत्येकी तीन ते चार वाक्यांत उत्तरे लिहा.

१. जनावरांच्या गोठ्यात लेखक तासन्‌तास का रमून जायचा ?
२. लेखकाच्या आनंदावर विरजण पडावे असे काय घडले ?
३. रडकुंडीला येऊन लेखक दाराच्या पायरीवर गप्प बसून का राहिला ?
४. शेवटी सगळ्यांचाच हिरमोड का झाला ?
५. अंगठ्याएवढे दावे तोडून जाण्याइतकी ताकद गाईच्या अंगी कशामुळे आली?

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. खालील शब्दसमूहांचा अर्थ सांगून त्यांचा वाक्यांत उपयोग करा.
   आनंदावर विरजण पडणे, आचारी का बिचारी होणे, माळ पालथा घालणे, अंगावर काटा उभा राहणे.
२. सोन्या आणि ती गाय दारात येऊन उभी राहिली, तेव्हा लेखक व त्याची आई यांच्यात काय संवाद झाला असेल; ते कल्पनेने लिहा.
३. 'आईचे प्रेम' या विषयावर एक छोटेसे भाषण तयार करा.
४. आईच्या प्रेमाची महती सांगणाऱ्या कवितांचा संग्रह करा.
५. तुमच्या घरातील पाळीव प्राण्यांशी तुम्ही कसे वागता ते खालील मुद्द्यांच्या आधारे सांगा.
   जवळ घेता/दूर हाकलता, अन्न-पाण्याची व्यवस्था करता/करत नाही, आवडतात/आवडत नाहीत, साखळीने बांधून ठेवता/ठेवत नाही इत्यादी.

**व्याकरण :**

| क्रम | जोडशब्द | पोटशब्द | एकापुढे एक आलेले स्वर | संधी होऊन बनलेला स्वर |
|---|---|---|---|---|
| १. | क्षणैक | क्षण + एक | अ + ए | ऐ |
| २. | सदैव | सदा + एव | आ + ए | ऐ |
| ३. | जलौघ | जल + ओघ | अ + ओ | औ |
| ४. | गंगौघ | गंगा + ओघ | आ + ओ | औ |
| ५. | मतैक्य | मत + ऐक्य | अ + ऐ | ऐ |

अ किंवा आ यांच्यापुढे ए किंवा ऐ हे स्वर आल्यास त्या दोहोंबद्दल ऐ येतो आणि अ किंवा आ याच्यापुढे ओ किंवा औ हे स्वर आल्यास या दोहोंबद्दल औ हा स्वर येतो.

| क्रम | जोडशब्द | पोटशब्द | एकापुढे एक आलेले स्वर | आदेश होऊन बनलेले अक्षर |
|---|---|---|---|---|
| १. | प्रीत्यर्थ | प्रीति + अर्थ | इ + अ | य् + अ = य |
| २. | अत्यानंद | अति + आनंद | इ + आ | य् + आ = या |
| ३. | अत्युत्तम | अति + उत्तम | इ + उ | य् + उ = यु |
| ४. | स्वल्प | सु + अल्प | उ + अ | व् + अ = व |
| ५. | पित्रौदार्य | पितृ + औदार्य | ऋ + औ = रौ | र् + औ = रौ |

इ-ई, उ-ऊ, ऋ या स्वरांच्या पुढे विजातीय स्वर आला तर इ-ई यांच्याबद्दल य् आणि उ-ऊ यांच्याबद्दल व्, र् हे आदेश येतात आणि त्यात पुढील स्वर मिळून संधी होतो.

| क्रम | जोडशब्द | पोटशब्द | एकापुढे एक आलेले स्वर | आदेश होऊन एकत्र येणारी |
|---|---|---|---|---|
| १. | नयन | ने + अन | ए + अ | अय् + अ = अय |
| २. | गायन | गै + अन | ऐ + अ | आय् + अ = आय |
| ३. | गवीश्वर | गो + ईश्वर | ओ + ई | अव् + ई = अवी |
| ४. | नाविक | नौ + इक | औ + इ | आव् + इ = आवि |

ए, ऐ, ओ, औ या स्वरांपुढे कोणताही विजातीय स्वर आला तर त्यांच्याबद्दल अनुक्रमे अय्, आय्, अव्, आव्, असे आदेश येतात व यातील शेवटच्या व्यंजनात पुढील स्वर मिळून संधी होतो.



# १. एक मुलाखत

**प्रियंवदा करंडे** (प्रियंवदा प्रकाश करंडे: जन्म १९४६) बाल, किशोर व कुमारवयीन मुलांसाठी लेखन करणाऱ्या कवयित्री व कथालेखिका. 'स्वामी विवेकानंद' (चरित्र), 'ज्ञानेश्वरांच्या गोष्टी', 'मी नाही जा आणि इतर गोष्टी' (बालकथासंग्रह) आणि 'हिरोंच्या शोधात', 'बाई आणि टेलिफोन', 'कविता जन्माला येतेय' (एकांकिका) इत्यादी साहित्य प्रकाशित.

न्यायमूर्ती य. वि. चंद्रचूड हे भारताच्या सर्वोच्च न्यायालयात सरन्यायाधीश होते. त्यांच्या मुलाखतीतून 'मुलाखत' या प्रकाराची मुलांना ओळख व्हावी, हा या पाठाचा उद्देश आहे.

भारताचे निवृत्त सरन्यायाधीश चंद्रचूडसाहेब यांच्या घरी मी त्या दिवशी सकाळी सुमारे नऊ वाजता फोन केला. आदल्या दिवशी त्यांचे विमान खूप उशिराने आले, हे मला माहीत होते. सकाळी फोनवर त्यांना तसदी देणे योग्य वाटले नाही, म्हणून त्यांच्या पत्नीकडे फोनवरून विचारपूस केली. तेव्हा त्या पटकन म्हणाल्या, "अहो, रात्री कितीही उशिराने झोपले तरी पहाटे पाच वाजता ते उठून आपल्या कामाला लागतात." या एकाच वाक्यातून एका शिस्तप्रिय, वक्तशीर असलेल्या व्यक्तिमत्त्वाची मला प्रचिती आली. ठरल्याप्रमाणे मी त्यांच्या मुलाखतीसाठी गेले. जवळजवळ एक तासभर त्यांच्याशी केलेल्या चर्चेतून चंद्रचूडसाहेबांच्या व्यक्तिमत्त्वाची झलक दिसून आली. तुम्हांलाही ती जाणून घ्यायला निश्चितच आवडेल.

**मी - आपलं शालेय शिक्षण कुठं, कशाप्रकारे झालं ?**

**चंद्रचूडसाहेब** - मी सरन्यायाधीशाच्या पदापर्यंत पोचू शकलो याचं श्रेय मी माझ्या शाळेला आणि काकांना देतो. माझे शालेय शिक्षण पुण्यातील नूतन मराठी विद्यालयात झालं. माझ्या भाग्याने मला श्री. म. माटे, पु. ग. सहस्त्रबुद्धे, के. ना. वाटवे, ना. ग. नारळकर असे गुणी, विचारवंत, बुद्धिमान आणि तळमळीचे शिक्षक लाभले. क्रमिक पुस्तकांखेरीज ते अवांतर वाचनावर फार भर दयायचे. ते आम्हांला इंग्रजी वाङ्मयातील उत्तमोत्तम पुस्तकांतील उतारेच्या

उतारे वाचून दाखवत. एखादी सुंदर कविता वाचून तिच्यातील नेमक्या सौंदर्याची आम्हांला जाणीव करून देत. केवळ अभ्यासासाठी लावलेल्या पुस्तकांबरोबरच जीवन कसं जगावं हे त्यांनी आम्हांला कळकळीने आणि डोळसपणे शिकवलं. माटे सरांना व सहस्त्रबुद्धे सरांना खेळांची फार आवड होती. या दोन्ही सरांनी खेळांवर विशेष भर देऊन आम्हां विद्यार्थ्यांत खेळांविषयी गोडी निर्माण केली. मी क्रिकेट खेळत असे.. रोज संध्याकाळी आम्हां विद्यार्थ्यांना मैदानावर नेऊन आमचे शिक्षक आम्हांला विविध खेळांसंबंधी मार्गदर्शन करत. खेळामुळे आपोआपच व्यायाम होई अन् मन ताजंतवानं राही.



**मी - आपण शालेय जीवनात कोणत्या प्रकारचं वाचन केलंत ?**

**चंद्रचूड** - मॅट्रिक होण्यापूर्वीच मी रवींद्रनाथ टागोरांची निम्म्याहून अधिक पुस्तकं वाचून काढली. अनेक इंग्रजी लेखकांचं देखील विपुल साहित्य मी मनापासून वाचलं. या सर्व पुस्तकांचे वाचन केवळ माझ्या शिक्षकांमुळे होऊ शकलं. दुसरी महत्त्वाची गोष्ट ही, की असं वाचन शालेय जीवनात झाल्यामुळे त्या वाङ्मयाचे संस्कार नकळत माझ्या विचारांवर, वागणुकीवर होत होते. मोठ्या वयात वाचन करून माणूस विद्वान बनू शकतो; पण बालवयातील संस्कारक्षम मन उत्तमोत्तम पुस्तकांच्या वाचनातून विकसित होते.

**मी - आपण चरित्रग्रंथ वाचले असतीलच. अशा कुठल्या व्यक्तीचा आपल्या मनावर विशेष प्रभाव पडला ?**

**चंद्रचूड** - मी खूप चरित्रग्रंथ वाचले. चरित्र म्हणजे थोर व्यक्तींच्या आयुष्याचा आलेखच; पण मला प्रभावित केले ते महात्मा गांधींच्या आणि जवाहरलाल नेहरूंच्या चरित्रांनी. त्यांची अनेक पुस्तकं मी अत्यंत आवडीनं वाचली. नेहरूंच्या पुस्तकांचा माझ्या जीवनावर फार खोलवर परिणाम झाला. इंदिरेस पत्रे, नेहरूंचे आत्मचरित्र ही पुस्तकं मी शालेय वयातच वाचून काढली. मला पुन्हा सांगावंसं वाटतं, की या वयात केलेल्या चांगल्या ग्रंथांचं वाचन भावी आयुष्यात अत्यंत उपयोगी पडतं.

**मी - आपल्या घरातील वातावरण कशा प्रकारचं होतं ? घरातील कोणकोणत्या व्यक्तींचा आपल्यावर प्रभाव पडला ?**

**चंद्रचूड** - पुण्यात बुधवार पेठेतील एका पेशवेकालीन वाड्यात आम्ही राहत होतो. माझं बालपण अतिशय सुखात, शिस्तीत आणि मजेत गेलं. एकत्र कुटुंबपद्धतीचा माझं व्यक्तिमत्त्व घडायला फार चांगला उपयोग झाला. माझे काका बाबासाहेब चंद्रचूड नामांकित वकील होते. त्यांनी आम्हांला चांगली शिस्त लावली. आम्ही सर्वजण पहाटे पाचला उठून एकत्र चहा घेत असू. कोणी पाचला उठलं, कोणी सहाला उठलं, पुन्हा चहा करा असे प्रकार कधीही घडत नसत. पहाटे उठण्याची ही सवय मला पुढे उपयोगी पडली. नियमितपणाची शिस्त लागली. शाळा सुटल्यावर आम्ही खूप खेळत असू. फिरायला गेलो तरी कोणत्याही परिस्थितीत संध्याकाळी सात वाजता आम्ही घरी आलं पाहिजे,

हा काकांनी घालून दिलेला दंडक आम्ही कटाक्षानं पाळला. इंग्रजी पहिलीत असल्यापासून आम्हांला वाड्यात येऊन संस्कृत शिकवायला किंजवडेकरशास्त्रींची नेमणूक केली होती. स्पष्ट उच्चार, स्वच्छ वाणी, पाठांतर, शुद्ध बोलणं वगैरे गोष्टी आम्ही त्यांच्याकडूनच शिकलो.

**मी - पण संस्कृत भाषा व वाङ्मय शिकवण्यामागे आपल्या काकांचा कोणता हेतू होता ?**

**चंद्रचूड** - संस्कृत शिकल्यामुळे वाङ्मयाची अभिरुची वृद्धिंगत झाली. विचारांची कक्षा रुंदावली. इंग्रजी आणि संस्कृत वाङ्मयाच्या अभ्यासानं मला निश्चितच फायदा झाला. काकांचा आम्हांला संस्कृत शिकवण्याचा हाच उद्देश असावा.

**मी - आपलं व्यक्तिमत्व घडवण्यात काकांचा नकळत परिणाम झाला असं वाटतं का?**

**चंद्रचूड** - हो. माझे काका निष्णात वकील होते. वकिली हा एक पेशा म्हणून जरी त्यांनी स्वीकारला असला, तरीही वकील आणि पक्षकार यांमध्ये स्नेहाचं, आपुलकीचं आणि विश्वासाचं नातं होतं. ते पक्षकाराचे खऱ्या अर्थी सर्व बाबतींत सल्लागार आहेत असं साऱ्यांना वाटत असे. त्यांच्या ज्ञानाचा माझ्या व्यक्तिमत्त्वावर खोलवर प्रभाव पडला. आम्हां मुलांकडून ते रोजची वर्तमानपत्र कटाक्षानं वाचून घेत. माझे वडीलही व्यासंगी आणि पुस्तकांचे भोक्ते होते. ते सतत वाचन करत असत.

**मी - आपल्या वडिलांबद्दल आणखी काही सांगू शकाल का ?**

**चंद्रचूड** - हो. वाचन झालं, की माझे वडील त्यावर टिपणं लिहीत. ते पाहून मीही टिपणं लिहिण्याची सवय लावून घेतली. मुंबई युनिव्हर्सिटीतील पहिल्या एल.एल.एम. पदवीधरांपैकी ते एक मानकरी होते. सांगण्यासारखी गोष्ट म्हणजे माझे वडील १९१२ मध्ये एल.एल.बी. परीक्षेत पहिले आले. त्यांना 'हिंदुराजे' स्कॉलरशिप मिळाली. १९४२ साली मीही एल.एल. बी. परीक्षेत पहिला आलो आणि तीच स्कॉलरशिप पटकावली. आणि गंमत म्हणजे १९७१ साली माझ्या मुलीनेही एल.एल.बी. मध्ये पहिली येण्याचा मान मिळवला आणि तिनंही ही हिंदुराजे स्कॉलरशिप मिळवली. त्या वेळी वर्तमानपत्रात ही बातमी 'चंद्रचूड घराण्याची हॅटट्रिक' या मथळ्याखाली प्रसिद्ध झाली होती.

**मी - शालेय जीवनातील वक्तृत्व व निबंधलेखन यांसंबंधी काही विचार सांगाल का ?**

**चंद्रचूड** - आमच्या शिक्षकांनी माझ्याकडून वक्तृत्व कलेचे धडे गिरवून घेतले. कुठल्याही विषयाची मांडणी, उच्चार, उभे राहण्याची पद्धत, आपले मुद्दे उठावदारपणे मांडण्याची रीत यांबद्दल त्यांनी आमच्याकडून कसून तयारी करून घेतली. सभाधीटपणा, अस्खलित वक्तृत्व, ओघवती शैली, नीट शब्दोच्चार हे वक्तृत्व गुण लहानपणीच आत्मसात केले जातात. कॉलेजमध्ये मी वक्तृत्वाच्या सभा गाजवल्या, त्या या बालपणीच्या अनुभवांवरच !

**मी - बालपणातील आपल्या आणखी काही महत्त्वाच्या आठवणी सांगाल ?**

**चंद्रचूड** - शाळेबरोबर माझ्या घरच्यांचेही ऋण मला मानलं पाहिजे. माझ्या घरी माझी आत्या, आजी, काकी, बहीण आम्हांला गोष्टी सांगायच्या. अशिक्षित बायकांना त्या ह. ना. आपटे यांच्या कादंबऱ्या वाचून दाखवत असत. मी ते सारं ऐकत, मनात साठवत, मोठा होत होतो. ते संस्कार माझ्या मनात खोलवर रुजले. लहान वयात घडणाऱ्या संस्कारांना पर्याय नाही, हेच खरं !

**मी - आपण मुंबई हायकोर्टात अठरा वर्षे वकिली केली. १९६० ते १९७२ सालापर्यंत न्यायाधीश आणि नंतर सरन्यायाधीश म्हणून भारताच्या सर्वोच्च न्यायालयात आपली नेमणूक झाली. न्यायदान क्षेत्रासंबंधी आपण काय सांगू इच्छिता ? न्यायदानाचे पूर्ण स्वातंत्र्य येथे आहे का ?**

**चंद्रचूड** - होय. सरन्यायाधीशावर कुठलंही दडपण नाही. न्यायदानाच्या बाबतीत मी स्वतंत्र होतो. न्यायालयाचं स्वातंत्र्य अबाधित राखणं हे न्यायाधीशांच्याच हाती आहे.

तर असं आहे माजी सरन्यायाधीशांच्या यशस्वी जीवनाचे रहस्य !

**प्रश्न :**

अ. खालील प्रश्नांची प्रत्येकी सहा ते सात वाक्यांत उत्तरे लिहा.

१. चंद्रचूड यांची शिस्तप्रियता आणि वक्तशीरपणा याची प्रचिती लेखिकेला कशावरून आली ?

२. चंद्रचूड यांच्या व्यक्तिमत्त्वावर कोणते महत्त्वाचे संस्कार झाले ? ते कोणामुळे, कशामुळे झाले ?
३. 'एकत्र कुटुंबपद्धतीचा माझं व्यक्तिमत्त्व घडायला फार चांगला उपयोग झाला', असे चंद्रचूड का म्हणतात ?

आ. खालील प्रश्नांची प्रत्येकी दोन ते तीन वाक्यांत उत्तरे लिहा.
१. संस्कृत भाषा शिक्षणाचे चंद्रचूड यांना कोणकोणते फायदे झाले ?
२. चंद्रचूड यांनी आपल्या बालपणी कोणकोणती पुस्तके वाचली ?

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. 'चंद्रचूड घराण्याची हॅटट्रिक' या शीर्षकाखाली बातमीवजा परिच्छेद तयार करा.
२. वर्तमानपत्रांतून प्रसिद्ध होणाऱ्या मुलाखती संग्रहित करा.

**व्याकरण :**

व्यंजन संधी :

व्यंजनान्त शब्दांच्या पुढे स्वर किंवा व्यंजन आल्यास खालीलप्रमाणे संधी होतो.

उदा. वाक् + मय = वाङ्मय - 'क' चा 'ङ्' झाला.
षट् + मास = षण्मास - 'ट' चा 'ण' झाला.
शरद् + काल = शरत्काल - 'द' चा 'त' झाला.
सत् + आचार = सदाचार - 'त' चा 'द' झाला.
अप् + ज = अब्ज - 'प' चा 'ब' झाला.
उत् + ज्वल = उज्ज्वल - 'त' चा 'ज' झाला.
सत् + चरित्र = सच्चरित्र - 'त' चा 'च' झाला.

**अभ्यास :**

संधी सोडवा : सन्मान, तल्लीन, सज्जन, सद्भावना, भगवद्गीता.

□□□



# १०. चुडीवाला

**जयश्री रुईकर** (जयश्री मधुकर रुईकर : जन्म १९३९) 'जयपराजय,' 'वेदनेला फूल आले' या कादंबऱ्या; 'मृगजळ', 'अंतर्मन' हे कथासंग्रह; 'स्वप्नातील विहीर' ही बालकादंबरी इत्यादी त्यांचे साहित्य प्रकाशित.

'अंतर्मन' या कथासंग्रहातील ही कथा आहे. महारोगी स्त्रियांच्या सेवेसाठी तळमळणाऱ्या बांगडीवाल्याचे हे हृदय शब्दचित्र आहे.

"अब्बाजान, आज मत जाओ ना तपोवनको."

"क्यूं बेटे ?"

"जाने दे, जाने दे अन्वर. काही बोलून फायदा आहे का ? आजचा दिवस म्हणजे तर त्यांच्यासाठी पर्वणीच! एवढं काय आहे त्या तपोवनात कोण जाणे." अब्दुलची बायको शन्नू नाराजीच्या सुरात आपल्या मुलाची समजूत काढत म्हणाली.

"मी लवकर येईन बेटा." हे आपल्या वडिलांचे बोलणे ऐकून अन्वर खेळायला निघून गेला.

अब्दुल कानाला मफलर गुंडाळत होता. तोच शन्नूच्या शब्दांना पुन्हा धार चढली.

"आज शक्रांत. त्यात मंगळवार. कितीतरी बायका बांगड्या भरायला आणि देवीच्या दर्शनाला येतील आणि आपलं दुकान बंद. रघुभैयाचा धंदा तेजीत चालणार आज आणि उद्या लगेच नवीन वस्तू येईल रघुभैयाच्या घरात. आणि तुम्ही? तुम्ही जाऊन बसा त्या तपोवनात. त्या बोटं झडलेल्या हातात बांगड्या भरत."

"शन्नू, चूप बैठ अभी."

एका हातात बांगड्यांची पेटी आणि एका हातात पिशवी घेऊन अब्दुलने पायात चपला सरकवल्या.

"हे बघा, रस्त्यानं कोणी भेटलं तर सांगू नका तपोवनात जातो म्हणून.

धंद्यावर परिणाम होतो त्याचा. समजलं ?''

अब्दुलने एकवार तिच्याकडे बघितले. तिच्या डोळ्यांतला क्रोध त्याच्या परिचयाचा होता; पण तिच्याकडे बघून आज त्याला तिचा राग आला नाही, तर कीव आली.

अब्दुल बसस्टॉपवर आला.

अनेक ठिकाणी उसवलेल्या स्वेटरमधून थंडी चांगलीच जाणवत होती. उन्हाची ऊब मिळावी म्हणून बसस्टॉपपासून थोड्या दूर उन्हात जाऊन अब्दुल बसला. थंडी थोडीशी कमी झाल्यासारखी वाटली.



बस आली. बांगड्यांची पेटी आणि पिशवी सांभाळत अब्दुल बसमध्ये चढला. अगदी खिडकीजवळ बसला. पेटी अलगद उचलून त्याने आपल्या मांडीवर ठेवली. गर्दीत कुणाचा धक्का लागला तर.....? लाल, हिरव्या, निळ्या- रंगीबेरंगी बांगड्यांकडे मोठ्या कौतुकाने त्याने बघितले. बस सुरू होताच थंडगार वाऱ्याचा झोत अधिकच त्रासदायक वाटू लागला. अब्दुलने मफलर कानाला घट्ट लपेटून घेतला.

जिल्हाधिकारी कचेरीजवळ पाऊण बस रिकामी झाली. तपोवनाकडे कोण जातोय कशाला ? जेमतेम पाच-सहाच उतारू राहिले बसमध्ये.

तपोवनाच्या त्या गोलाकार कमानीकडे अब्दुलचे लक्ष गेले. गेल्या सहा महिन्यांत केवढी फुलली आहे तिच्यावरची वेल. मागे आलो तेव्हा जेमतेम हातभर होती. अब्दुल गेटजवळ आला आणि लहान लहान मुलींनी एकदम गलका करायला सुरुवात केली.

''चुडीवा ऽ ला आ ऽऽ ला, चुडी ऽऽ वाला आला.''

आंब्याच्या झाडाखाली असलेल्या चौथऱ्यावर अब्दुल बसला आणि क्षणातच सारा कामधंदा सोडून स्त्रियांची गर्दी अब्दुलच्या आजूबाजूला जमली.

''त्या लाल रंगाच्या मला .... त्या हिरव्या मला.... चुडीवाला, माझ्यासाठी आरसा आणला ? मागच्या वेळी मी सांगितलं होतं नं?''

अब्दुलच्या आजूबाजूला गर्दीच गर्दी झाली आणि गोंधळ सुरू झाला. प्रत्येकीला प्रथम बांगड्या भरायच्या होत्या.

अब्दुल एकेकीच्या हातांत बांगड्या भरू लागला. त्यांना हव्या तशा; त्यांच्या मनपसंत. त्यांना बांगड्या भरणं म्हणजे एक दिव्यच ! पण अब्दुलला ती कला साधली होती. बांगड्या भरल्यानंतरचा त्यांच्या चेहऱ्यावरचा आनंद अब्दुलला लाखमोलाचा वाटे.

दोन-तीन तास बांगड्या भरण्याचा कार्यक्रम सुरू होता. साऱ्या तपोवनातील तो एक आनंदाचा आणि चैतन्याचा दिवस ! आवाज, गडबड, गोंधळ, चेहऱ्यावरचा आनंद आणि हे सारे वातावरण निर्माण करणारा चुडीवाला अब्दुल म्हणजे तपोवनातील स्त्रियांना, मुलींना अगदी देवदूतासारखा वाटे. वर्षातून दोनदा, संक्रांतीला आणि ज्येष्ठ पौर्णिमेला चुडीवाल्याची तपोवनातील स्त्रिया आतुरतेने

वाट पाहत आणि अब्दुललाही तो आनंद बघून विलक्षण समाधान लाभे.

असेच काही दिवस गेले. एक दिवस रघुभैया आला. त्याच्या हाती पोस्टमनने दिलेले पत्र होते.

''अब्दुलमियाँ, तपोवन से चिठ्ठी आयी है आपको.''

''दिखाव..... दिखाव.''

''अरे, पण चिठ्ठी मराठीतून आहे.''

''मग वाचून दाखव नं तूच.''

रघुभैयाने चिठ्ठी मोठ्याने वाचली. चिठ्ठीतला मजकूर ऐकून अब्दुल आणि शन्नू यांना खूपच आनंद झाला.

तपोवनात होणाऱ्या संमेलनाच्या प्रसंगी अब्दुलचा खास सत्कार होणार होता आणि त्यासाठी पत्र पाठवून दाजीसाहेबांनी त्याला निमंत्रण दिले होते.

दोन दिवसांनीच सत्कार समारंभ होता. कधीही लाभणार नाही असे सत्काराचे भाग्य त्याच्या वाट्याला आले होते. पत्र आल्यापासून तो त्याच आनंदात होता. पुन्हा पुन्हा तो स्वतःच स्वतःला विचारत होता, सत्कार करण्याएवढे मी काय केले आहे तपोवनासाठी ?

अब्दुल तपोवनात आला तेव्हा कार्यक्रम सुरू झाला होता. सामूहिक गायन चालू होते. अब्दुलला बघताच एक मुलगा समोर आला.

''चुडीवाले चाचा, बहोत देर कर दी.''

''बस देरसी आयी, इसीलिये देर हो गई बेटे.''

''चाचा, आप उधर बैठिए.''

स्टेजच्या समोर, बाजूला मांडलेल्या खुर्च्यांवर काही निमंत्रित पाहुणेमंडळी बसली होती. अब्दुलला त्यांच्याबरोबर बसायला संकोच वाटला. तो तसाच उभा राहिला. तेवढ्यात खुद्द दाजीसाहेबांनीच त्याला बोलावून जवळच्या खुर्चीवर बसायला लावले.

सत्कार समारंभाच्या कार्यक्रमाला सुरुवात झाली. सुरुवातीचे अध्यक्षांचे स्वागत वगैरे औपचारिक झाल्यावर दाजीसाहेबांनी बोलायला सुरुवात केली. अब्दुल बघतच राहिला, चौऱ्याऐंशी वर्षांच्या वृद्धाचा ताठपणा, उंच सडसडीत देहयष्टी, तेजःपुंज चेहरा, गौरवर्ण, पांढरेस्वच्छ धोतर, त्यावर बंद गळ्याचा कोट आणि

डोक्याला केशरी फेटा. या वयातही आवाजातला खणखणीतपणा आणि बोलण्यातली ऐट यामुळे अब्दुल भारावून बघत राहिला. दाजीसाहेब बोलत होते–

"रामानं सेतुबंधन केलं; पण त्यासाठी अनेकांचा हातभार लागला. अगदी लहानशी खार, पण तिनंसुद्धा आपल्या शक्तीप्रमाणे सेतुबंधनाला मदत केली. तशीच मदत या तपोवनासाठी देणाऱ्या काही व्यक्ती आम्हांला सुदैवाने लाभल्या आहेत. संक्रांतीला आणि ज्येष्ठ पौर्णिमेला बांगड्या भरण्याचा प्रस्ताव जेव्हा समोर आला, तेव्हा अनेक बांगडीवाल्यांना भेटून इथं येण्याबद्दल विनंती केली; पण कुणीही माझ्या विनंतीचा स्वीकार केला नाही; अब्दुलमियाँनी मात्र स्वतःहून इथं येण्याचं आश्वासन दिलं आणि दरवर्षी न चुकता अब्दुलमियाँ इथं येतात. येथील भगिनींच्या जीवनात आनंदाचा वर्षाव करतात. वर्षातले दोन दिवस तपोवनात अतिशय आनंदाचे आणि उत्साहाचे असतात. कुठल्याही मोबदल्याची अपेक्षा न करता अब्दुलमियाँ न बोलावता दरवर्षी येतात. तपोवनातील स्त्रिया, मुलीबाळी त्यांच्या येण्याकडे डोळे लावून बसलेल्या असतात. अब्दुलमियाँचे हे समाजकार्य, ही मानवसेवा खरोखर फार फार मोठी आहे. अनमोल आहे आणि म्हणूनच आज त्यांचा सत्कार करण्याचं ठरवलं आहे. तेव्हा त्या सत्काराचा स्वीकार अब्दुलमियाँनी इथं येऊन करावा."

अब्दुल स्टेजवर चढला. दाजीसाहेबांनी फुलांचा गुच्छ आणि तपोवनातील लोकांनी तयार केलेली सुंदर फुलदाणी त्याला दिली. टाळ्यांचा कडकडाट झाला. अब्दुल अतिशय भारावून गेला. त्याने चटकन दाजीसाहेबांच्या पायांना स्पर्श केला.

बराच उशीर झाला होता. अमरावतीहून आलेली निमंत्रित मंडळी मोटारीतून जाणार होती. दाजीसाहेबांनी अब्दुलला त्यात बसवले. मोटार धावत होती. अब्दुल विचार करत होता, आज शन्नूला आणायला हवे होते. तिचा घुस्सा तरी कमी झाला असता. मोटार धावत होती. आकाशात अष्टमीचा चंद्र हसत होता. आकाश मेघविरहित निळ्या नितळाईने नटले होते. वातावरण अंतर्बाह्य प्रसन्न वाटत होते.



अंबादेवीच्या चौकात मोटार थांबली. अब्दुल खाली उतरला. घरी आला. अब्दुल येताच शन्नू उठली. थाळीत चपाती आणि वांग्याची भाजी घेऊन तिने थाळी अब्दुलसमोर ठेवली. अब्दुल एखाद्या अपराध्यासारखा मान खाली घालून जेवू लागला.

"तू नहीं खायेगी ?"

"नहीं, जी नहीं चाहता खानेकू ।"

"अन्वर जेवला ?"

"जेवला. पण खिम्यासाठी हट्ट धरून बसला होता."

अब्दुलच्या हातातला घास हातातच राहिला. एकाएकी जेवणावरची इच्छाच मरून गेली. तोंडात घास घोळू लागला.

"कितीदा सांगितलं हा धंदा सोडून दुसरा धंदा सुरू करा. पण..."

शन्नूचे पुढचे बोलणे अब्दुलने ऐकलेच नाही. तो चटकन उठला. हात धुऊन अन्वरच्या शेजारी येऊन पडला. शन्नूचे बोलणे, त्यातला शब्दन् शब्द त्याला पाठ होता. कितीदा तरी तेच ते बोलून झाले होते.

"नवीन धंदा.... नवीन धंदा.... भांडवल नको? कुठून आणणार?" तो थोडासा जोराने पण शन्नूला ऐकायला जाईल अशा आवाजात बोलला. पण भांडवलापेक्षाही त्याला अब्बाजानपासून चालत आलेला हा बांगड्यांचा धंदा सोडवत नव्हता.

.... नवरात्र जवळच होते. त्यात धंदा चांगला झाला. लोक आता दिवाळीच्या तयारीला लागले होते. रघुभैय्याने दुकानाला रंग देण्याचे काम काढले होते. अब्दुल दुकानावर आला. त्याचा चेहरा उदास दिसत होता. रघुभैय्याने त्याला आवाज दिला,

"क्यूं, आज दुकान नहीं खोलता?"

"नाही रघुभैया.. हे तपोवनच आता दाजीसाहेबांच्या हाती राहिलं नाही. हे कळलं, तेव्हापासून मन नाही लागत धंदा करायला. आता तपोवनाचं काय होईल रे रघुभैया? केवढी मोठी वसाहत! किती रोगी! आता त्यांची कशी काळजी घेतली जाईल रे? आणि आयुष्याचं मोल देऊन तन-मन-धनानं फुलवलेली ती कर्मभूमी सोडण्याच्या कल्पनेनं दाजीसाहेबांना काय वाटलं असेल बरं?" अब्दुल विलक्षण हळवा झाला.

"चल रघुभैया, मेरे साथ चल तपोवन. आज शेवटलं दर्शन घेऊन येऊ त्या तपोवनाचं. वेदनांशी झगडणाऱ्या त्या रोग्यांच्या मनाची आज काय अवस्था झाली असेल रे?" पण रघुभैयाचे रंगाचे काम अर्धवट पडले होते. अब्दुल एकटाच गेला. अमरावतीहून लोक तपोवनात जात होते. त्यात अब्दुल मिसळून गेला. तपोवनातील दृश्य अतिशय केविलवाणे होते.

काही कुष्ठरोग्यांना इतरत्र पाठवले होते. ते रोगी, रातोरात पायीपायी परत तपोवनात आले होते. दाजीसाहेबांजवळ रडत होते. सारे तपोवन सुन्न झाले होते. शोकसागरात बुडाले होते. आठ दिवसांनीच दीपावलीचे असंख्य दीप घरोघरी, रस्तोरस्ती उजळणार होते; पण ज्यांच्या अंधकारमय जीवनात आशेचा दीप आजपर्यंत तेवत होता तो आता मालवणार होता.

अतिशय दुःखी मनाने अब्दुल तपोवनातून घरी आला. काहीही न बोलता पडून राहिला.

"खाना नहीं खाने का क्या?"

"नहीं."

"क्यूं ? तब्येत ठीक नाही का ? चेहरा असा का दिसतो तुमचा ?"

शन्नूने अब्दुलच्या कपाळाला हात लावून बघितले.

अब्दुलला वाटले चार भिंतींच्या आत स्वतःत दंग असणाऱ्या हिला माझे दुःख कळणेच शक्य नाही. प्रत्येकाचे जीवन जगण्याचे मार्ग वेगवेगळे असतात, हेच खरे!

रात्र वरवर चढत होती. डोक्यावर पांघरूण घेऊन अब्दुल पडून होता. डोळ्यांसमोर फिरत होते तपोवन.... तिथल्या आठवणी!



देवळातल्या पहारेकऱ्याने दोनचे टोले दिले. शन्नू घोरत होती. अन्वर गाढ झोपला होता. अब्दुल उठला. अगदी हलकेच. कोपऱ्यात बांगड्यांच्या पेटीवर ठेवलेल्या पिशवीतील एकेक वस्तू बाहेर काढू लागला. पावडरचा डबा, रुमाल, रिबिनी, पिना, सोनेरी बांगड्या, साध्या बांगड्या, नायलॉनच्या बांगड्या... संक्रांतीला हे सारे तपोवनात नेणार होता. तिथे 'चुडीवाला... चुडीवाला...' म्हणून स्त्रिया, मुलीबाळी धावतधावत त्याच्याजवळ जमणार होत्या. काही काळ तरी सारे विसरून हसणार होत्या आणि त्यांचे हसू बघून अब्दुल मनोमन सुखावणार होता, पण आता.... आता सारे संपले होते.

स्वतःसाठी सारेच जगतात, पण दुसऱ्यासाठी जगण्यातला आनंद? त्या आनंदाचे सुख वर्षातून फक्त दोनदाच अब्दुल अनुभवायचा. पण आता? आता तेही मिळणार नव्हते. एखादया वस्त्राचा एकाएकी रंग उडून जावा तशी त्याची जीवनेच्छा एकाएकी उडून गेली.

त्या साऱ्या वस्तूंकडे बघता बघता अब्दुलचे डोळे पाण्याने काठोकाठ भरून आले. त्यात तपोवनाचा परिसर विरघळत होता... हळूहळू... रात्र उतरणीला लागली होती...

**प्रश्न :**

खालील प्रश्नांची थोडक्यात उत्तरे लिहा.

१. शन्नूच्या डोळ्यांतला क्रोध पाहूनही अब्दुलला राग न येता कीव का आली?
२. तपोवनातील स्त्रिया चुडीवाल्याची आतुरतेने का वाट पाहत असत?
३. दाजीसाहेबांनी सत्कार समारंभात कोणते विचार व्यक्त केले?
४. प्रत्येकाचे जीवन जगण्याचे मार्ग वेगवेगळे असतात, हा विचार अब्दुलच्या मनात कोणत्या प्रसंगी व का आला?

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. चुडीवाला अब्दुल तपोवनातील स्त्रियांना, मुलींना देवदूतासारखा वाटे. का ते सांगा.
२. हा धंदा सोडून दुसरा धंदा सुरू करा, असे शन्नू का म्हणत असे?
३. 'स्वतःसाठी सगळेच जगतात, पण दुसऱ्यासाठी जगण्यातला आनंद हा वेगळाच असतो', या विषयावर पंधरा ओळींपर्यंत निबंध लिहा.
४. 'दोन मेणबत्त्या' हा अनंत काणेकरांचा लघुनिबंध मिळवून वाचा.

**व्याकरण :**

| कर्ता | कर्म | क्रियापद |
| --- | --- | --- |
| मुलगा | पुस्तक | वाचतो |
| मुलगी | पुस्तक | वाचते |
| मुलगे | पुस्तक | वाचतात |

वरील पहिल्या वाक्यात कर्ता 'मुलगा' हे पुल्लिंगी नाम आहे, म्हणून क्रियापदाचे रूप 'वाचतो' असे आहे. दुसऱ्या वाक्यात 'मुलगी' हा कर्ता आहे. कर्त्याचे रूप स्त्रीलिंगी असल्यामुळे क्रियापदाचे रूप 'वाचते' असे झाले.

तिसऱ्या वाक्यात 'मुलगे' हा कर्ता अनेकवचनी आहे. तेथे कर्त्याचे वचन बदलताच क्रियापदाचे 'वाचतात' असे रूप झाले.

| कर्ता | कर्म | क्रियापद |
| --- | --- | --- |
| मुलाने | पुस्तक | वाचले |
| मुलाने | पोथी | वाचली |
| मुलाने | पोथ्या | वाचल्या |

वरील तिन्ही वाक्यांत 'मुलाने' कर्ता आहे.

पहिल्या वाक्यात 'पुस्तक' हे कर्म आहे. ते नपुसकलिंगी असून एकवचनी आहे. म्हणून 'वाचले' असे क्रियापदाचे रूप आहे. दुसऱ्या वाक्यात 'पोथी' असे स्त्रीलिंगी कर्म आलेले आहे. त्यामुळे क्रियापदाचे रूप 'वाचली' असे झाले. तिसऱ्या वाक्यात 'पोथी' याचे अनेकवचनी रूप पोथ्या असे करताच क्रियापदाचे रूप 'वाचल्या' असे झाले.

वाक्यात कर्त्याच्या किंवा कर्माच्या लिंग-वचनाप्रमाणे क्रियापदाच्या रूपाची जी ठेवण, रचना किंवा योजना असते तिला व्याकरणात **प्रयोग** असे म्हणतात. प्रयोगाचे **कर्तरी, कर्मणी** व **भावे** असे तीन प्रकार आहेत.





# ११. माणसात देव शोधणारा संत

**आचार्य अत्रे** (प्रल्हाद केशव अत्रे: १८९८-१९६९) शिक्षणतज्ज्ञ, नाटककार, पत्रकार, कवी, विडंबनकार, चित्रपट कथालेखक, विनोदी वक्ता इत्यादी अनेक नात्यांनी आचार्य अत्रे महाराष्ट्राला सुपरिचित आहेत. त्यांनी 'नवयुग' व 'मराठा' ही नियतकालिके चालवली. त्यातून विपुल लेखन केले. 'साष्टांग नमस्कार', 'लग्नाची बेडी' इत्यादी विनोदी व 'घराबाहेर', 'उद्याचा संसार' इत्यादी गंभीर नाटके; 'मी कसा झालो ?', 'कऱ्हेचे पाणी' हे आत्मचरित्रपर ग्रंथ प्रसिद्ध.

हा पाठ 'कऱ्हेचे पाणी' या पुस्तकातून घेतला आहे.

समाजाच्या उद्धारासाठी अत्यंत तळमळीने जीवन वेचलेल्या संत गाडगेबाबांचा परिचय या लेखात करून दिला आहे.

महाराष्ट्र हा संतांचा देश आहे. ही संतांची परंपरा गेली अनेक शतके महाराष्ट्रात अखंडित चालू आहे. लोकोद्धाराचे महान मंदिर संतांनी या महाराष्ट्रात उभारले. त्याचा पाया संत ज्ञानेश्वरांनी घातला. संत नामदेवांनी त्याच्या भिंती बांधल्या. संत एकनाथांनी त्यावर घुमट चढवला. तुकोबा त्याचे कळस झाले आणि संत गाडगेबाबांनी त्या कळसावर पताका फडकावली !

ज्ञानोबापासून ते गाडगेबाबांपर्यंत सर्व संतांचे म्हणणे एक, की 'देव हा देवळात नाही, दगडात नाही, माणसात आहे.' पण दुर्दैवाची गोष्ट, संतांनी आकाशपाताळ एक केले, तरी माणसातला परमेश्वर अजून लोकांना दिसत नाही. त्यांना दगडातला परमेश्वर दिसतो. पन्नास वर्षे गाडगेबाबांनी लक्षावधी लोकांना सतत ओरडून सांगितले, की 'बाबांनो, दगडांधोंड्यांची पूजा करू नका रे. माणसांची पूजा करा. तीर्थी धोंडापाणी, देव रोकडा सज्जनी।'

डोक्यावर झिंज्या, अंगावर चिंध्या, एका हातात खराटा आणि एका हातात मडके. प्रारंभी लोकांना कळेना, की हा माणूस वेडा आहे, की दूधखुळा आहे. कुठे, कुणाच्या घरात राहायचे नाही. भाकरीचा तुकडा खायचा. खापरातून पाणी प्यायचे आणि ज्या गावी जायचे ते गाव हातातल्या झाडूने झाडून स्वच्छ करायचे. काही दिवसांनी लोकांना वाटले, की हा कोणी अवलिया दिसतो

आहे. त्याबरोबर लोक त्यांच्या पाया पडायला गेले, की त्यांच्या पाठीवर खराटा मारून ते पळालेच. उभ्या आयुष्यात त्यांनी आपल्या पायाला कोणाला हात लावू दिला नाही किंवा भूतभविष्य सांगून किंवा अंगारे-धुपारे देऊन बुवाबाजी केली नाही.

कीर्तन हे गाडगेबाबांचे खरे सामर्थ्य. आपल्या खेडवळ लाडक्या वऱ्हाडी बोलीमध्ये तासन् तास ते हजारो श्रोत्यांना मंत्रमुग्ध करून ठेवत. काव्य आणि विनोद यांचा धबधबा त्यांच्या मुखातून वाहायचा. गरिबांचा आणि दलितांचा उद्धार हा एकच त्यांच्या कीर्तनाचा विषय. 'देवळात जाऊ नका. मूर्तीची पूजा करू नका. देवापुढे पैसा-फळे ठेवू नका. तीर्थयात्रेला जाऊ नका. सत्यनारायण पुजू नका. पोथीपुराणातल्या चमत्कारांवर विश्वास ठेवू नका. कोणाचा मंत्र नि गुरूपदेश घेऊ नका. प्राण्यांची हत्या करू नका. सावकाराचे कर्ज काढू नका. अडाणी राहू नका.' ही शिकवण सतत आयुष्यभर हजारो कीर्तनं करून गाडगेबाबांनी जनतेला दिली.

गरिबांसाठी साऱ्या महाराष्ट्रात त्यांनी ठिकठिकाणी धर्मशाळा बांधल्या. या सर्व धर्मशाळांची व्यवस्था बाबांनी चोख आणि नमुनेदार ठेवली. बाबा म्हणजे खरोखर एक चमत्कार होता. त्यांच्या अंगामध्ये अनेक अलौकिक शक्ती होत्या, की ज्यांचे आकलन कोणालाही होऊ शकले नाही. 'रंजल्यागांजल्यांना 'आपुले' म्हणणारा आणि अनाथ आपंगितांना हृदयाशी धरणारा तो खरा साधू' ही तुकोबांची व्याख्या गाडगेबाबांना अक्षरशः लागू पडते. माणसामधल्या परमेश्वराची पूजा करणाऱ्या या संताने महाराष्ट्राच्या सार्वजनिक जीवनात एक प्रचंड सामर्थ्य निर्माण केले.

कोणत्याही गावात त्यांनी पाऊल टाकले, की पहिल्याने त्यांच्या हातातला झाडू चालू लागे. मग लोक जागे होत आणि हातात खराटे घेऊन धावत. सकाळी गावातील घाण झाडूने साफ केली, म्हणजे मग संध्याकाळी लोकांच्या डोक्यांतील घाण बाबा आपल्या कीर्तनाने साफ करत. हे गाडगेबाबांच्या जीवनाचे आणि सेवेचे तंत्र होते. डोक्यावर खापराच्या तुकड्याचे शिरस्त्राण, अंगावर रंगीबेरंगी चिंध्या, एका कानात एक कवडी लोंबत आहे, दुसऱ्या कानात फुटक्या बांगडीची काच डुलते आहे, असा बाबांचा अवतार असे.

बाबा एरवी कोणाशी बोलत नसत. गप्पा मारत नसत. एका ठिकाणी तर ते मुळीच बसत नसत. मग बोलणार कोणाशी काय? नुसते त्यांना पाहून ते तुम्हांला कधीच समजले नसते. सिंहाला पाहावे वनात, हत्तीला पाहावे पाण्यात, तसे गाडगेबाबांना पाहावे कीर्तनात! हजारो माणसांच्या प्रचंड समुदायामध्ये बाबा एकदा उभे राहिले म्हणजे पावसाळ्यातल्या मेघासारखे ते आभाळभर गडगडू लागत आणि डोक्यावर साहित्याचा, सद्भावनेचा आणि सद्‌विचारांचा असा काही मारा सुरू होत असे, की श्रोते अक्षरशः त्या कीर्तनाच्या सरोवरात देहभान





व्यक्तिचित्र चित्रकार : श्री. रामकृष्ण कांबळे

## प्रतिसाद :

❑ चित्रकार : रामकृष्ण कांबळे

निसर्गाची सुंदर रूपे पाहून कवी कविता रचतात आणि चित्रकार चित्रे रेखाटतात. माणसाच्या चेहऱ्यावर तसेच हालचालींतूनही स्वभावाची, भाव-भावनांची सुंदर रूपे कवींना व चित्रकारांना दिसतात. त्यावर कविता व चित्रे होतात. प्रतिसाद हे अशा प्रकारचे एक व्यक्तिचित्र आहे. रश्मी नावाच्या एका बालिकेचे हे वेधक चित्र चित्रकार रामकृष्ण कांबळे यांनी रेखाटलेले आहे.

रश्मीला अचानकपणे कुणीतरी हाक मारली, त्यामुळे ती क्षणभर थबकली, उजवा हात नकळतपणे कमरेवर घेऊन हाकेच्या दिशेने किंचितशी मान वळवून ती नजरेने वेध घेऊ लागली. रश्मीच्या प्रतिसादाचा हा क्षण चित्रकाराने अचूकपणे टिपला आहे. या बालिकेच्या चेहऱ्यावर किती वेधक भाव या क्षणी उमटले आहेत! त्यात विस्मय आहे, उत्सुकता आहे, शंका आहे, प्रश्न आहेत आणि उत्तरे किंवा प्रतिसादही आहे. त्या अनपेक्षित हाकेला ओ देण्यासाठीच जणू या मुलीचे मन व शरीर किंवा सगळेच व्यक्तिमत्त्व चेहऱ्यावरील भाव-भावनांतून एकवटून आले आहे. कमरेवर हात ठेवून एक प्रकारच्या ठाम आत्मविश्वासाने त्या हाकेचा वेध घेत आहे.

या चित्रात चित्रकाराने पारदर्शक जलरंग वापरले आहेत. जलरंगांतून नाजुकपणाने व सूक्ष्मपणाने भावचित्रण करता येते. किंबहुना जलरंग भावचित्रणाला अधिक परिणामकारक करू शकतात. चित्रकाराने मोजक्याच फिक्या रंगाचा व नाजूक रेषांचा उपयोग केला आहे. या चित्राची पार्श्वभूमी व सर्वच बाजू देखील रंगवताना गडद रंग वापरले नाहीत. नाजूक भावचित्रणाला गडद रंगाच्या पार्श्वभूमीमुळे विसंगत ठरणारा जडपणा प्राप्त होतो. चित्रकाराने हे टाळले आहे. जलरंगात कागदाच्या मूळ पांढऱ्या भागाचा उपयोग कौशल्याने करून प्रकाशाचा परिणाम साधावा लागतो. रश्मीच्या फ्रॉकचे चित्रण याच रीतीने चित्रकाराने केले आहे. फ्रॉकवर मोजक्याच रंगछटा दाखविल्या आहेत व प्रकाशाचा उठावदारपणा साधला आहे.

रश्मीच्या चेहऱ्यावरील भावनांची गुंतागुंत व तिची उभी राहण्याची ढब या गोष्टी आपल्या नजरेला खिळवून ठेवतात. पुन्हा पुन्हा हे चित्र बघत राहावे, असे वाटते. रंगरेषांतून भाव-भावनांचा हा तरल, वेधक आविष्कार कलावंतच साधू शकतो, कॅमेऱ्याला छायाचित्रातून असा आविष्कार साधेलच असे म्हणता येणार नाही.

– प्रा. रा. ग. जाधव

विसरून तासन् तास डुंबत राहत असत. कीर्तनासाठी बाबांना साहित्य लागत नसे. टाळ नाही, वीणा नाही, बाजाची पेटी नाही, मिळाली तरी वाहवा, न मिळाली तरी वाहवा. रस्त्यावरचे दोन दगड वेचून ते वाजवायला लागत. श्रोत्यांच्या टाळ्या आणि घोष हेच त्यांच्या कीर्तनाचे सारे भांडवल असे. बाबांना वाचता येत नसे. लिहिता येत नसे; पण तुकोबांचे अभंग त्यांच्या जिभेवर नाचत असत.

बाबांचे कीर्तन अज्ञांसाठी होते, दुःखितांसाठी होते. त्यात योग नव्हता, अध्यात्मवाद नव्हता. पोथी नव्हती, पुराण नव्हते. देवांची वर्णने नव्हती. पूजा, यात्रा यांचा उपदेश नव्हता. त्यांत शुद्ध जीवन होते. हजारो वर्षे समाजाच्या आर्थिक सत्तेखाली आणि धार्मिक रूढीखाली भरडून निघाल्यामुळे दूधखुळ्या, देवभोळ्या आणि अंधळ्या-पांगळ्या झालेल्या हीन-दीन समाजाच्या उद्धाराचा झणझणीत प्रकाशझोत म्हणजेच गाडगेबाबांचे कीर्तन.

खोपोलीच्या अलीकडे उजव्या बाजूला एक रस्ता फुटतो. त्याला शीळ फाटा म्हणतात. तेथून आतमध्ये एका मैलावर एक यात्रा भरत असे. तिकडे बाबांना बोलावणे होते.

उजव्या बाजूला एका उंच टेकडीच्या आजूबाजूच्या मैदानात यात्रेच्या निमित्ताने एक गावच वसलेले होते. कार्तिक महिन्यात पंधरा दिवस ही यात्रा भरते. या पंधरा दिवसांत हजारो लोक तेथे येतात. तिथे बाबांनी भजनकऱ्यांना ओळीने उभे केले आणि हातातल्या काठीने इशारा केला. त्याबरोबर टाळ्यांच्या तालावर 'गोपाला, गोपाला, देवकीनंदन गोपाला' या त्यांच्या आवडत्या भजनाचा वातावरणात गजर उठला. सभोवार यात्रेचा एवढा गोंगाट चाललेला होता; पण त्या गोंगाटामधून एखादया कारंजाच्या धारेप्रमाणे बाबांचे भजन वर उचंबळले. क्षणार्धात भोवतालचा गोंगाट थांबला आणि शेकडो स्त्री-पुरुष आणि मुले बाबांच्या भोवती जमली आणि टाळ्यांच्या तालावर 'गोपाला, गोपाला, देवकीनंदन गोपाला' हे भजन गाऊ लागली.

नेहमीप्रमाणे भजन केल्यानंतर बाबांनी उपदेशाचे दोन शब्द सांगितले, ''बाबांनो, दया हा जगातला सर्वांत मोठा धर्म आहे. कबीर कहे कमालकू सबसे बडी दया। तीरथ जावो, काशी जावो, चाहे जावो गया–''

बाबांचे कीर्तन याप्रमाणे एक-दोन तास चाले. हजारो लोक देहभान विसरून आणि कानांत प्राण आणून त्यांचा शब्दन् शब्द आपल्या हृदयात साठवून ठेवत.

**प्रश्न :**

खालील प्रश्नांची थोडक्यात उत्तरे लिहा.

१. गाडगेमहाराजांचे खरे सामर्थ्य कशात होते ?

२. गाडगेमहाराजांनी कीर्तनातून लोकांना कोणती शिकवण दिली ?

३. संत गाडगेबाबांचा नेहमीचा वेष कसा असायचा ?

४. संत गाडगेबाबांच्या कीर्तनाचे स्वरूप कसे होते ?

५. सिंहाला पाहावे वनात, हत्तीला पाहावे पाण्यात, गाडगेबाबांना पाहावे कीर्तनात, असे लेखकाला का वाटते ?

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. संत गाडगेबाबांच्या जीवनातील काही घटना माहीत करून घ्या. त्या वर्गात सांगा.

२. संत गाडगेबाबांनी कीर्तनातून केलेला उपदेश एका तक्त्यावर सुवाच्य अक्षरांत लिहून काढा आणि तो तक्ता घरी सर्वांना दिसेल अशा ठिकाणी लावा.

३. सार्वजनिक स्वच्छता व आरोग्य या विषयावर वर्गामध्ये छोटेसे भाषण करा.

४. 'दया हा सर्वश्रेष्ठ धर्म आहे' हे दाखवून देणाऱ्या दोन-तीन गोष्टी माहीत करून घ्या. त्या वर्गात सांगा.

५. 'महाराष्ट्र हा संतांचा देश आहे' या विषयावर बारा ते पंधरा वाक्यांचा परिच्छेद लिहा.

६. गाडगेमहाराज जेथे जात, तेथे प्रथम तेथील परिसर स्वच्छ करत, तसे तुम्ही तुमचे घर, वर्ग, शाळा व परिसर स्वच्छ ठेवा.

**व्याकरण :**

कर्तरी प्रयोग.

'मुलगा फूल पाहतो.' या वाक्यात 'मुलगा' हा कर्ता, 'फूल' हे कर्म व 'पाहतो' हे क्रियापद असून ते सकर्मक आहे. आता हे क्रियापद कोणाप्रमाणे चालते, म्हणजे याचा प्रयोग कोणता ते खालील तक्त्यातील उदाहरणावरून पाहू.

मूळ वाक्य—मुलगा फूल पाहतो.

| क्र. | कोणता बदल करायचा | | कर्ता | कर्म | क्रियापद |
|---|---|---|---|---|---|
| १. | कर्त्याचे लिंग बदलू | (स्त्रीलिंगी) | मुलगी | फूल | पाहते |
| २. | कर्त्याचे वचन बदलू | (अनेकवचनी) | मुलगे | फूल | पाहतात |

| | | | |
|---|---|---|---|
| ३. कर्त्याचा पुरुष बदलू (द्‌वितीय पुरुष) | तू | फूल | पाहतोस |
| ४. | मुलगा | | जातो |

कर्तरी प्रयोगात कर्त्याच्या लिंग, वचन, पुरुषाप्रमाणे क्रियापदाचे रूप असते. वरील पहिल्या तीन वाक्यांत क्रियापदाचे रूप कर्त्याच्या लिंग, वचन, पुरुष यांच्याप्रमाणे बदलते. या वाक्यात 'फूल' हे कर्म असल्यामुळे 'पाहतो' हे क्रियापद 'सकर्मक' आहे, म्हणून हा 'सकर्मक' कर्तरी प्रयोग होय.

वरील चौथ्या वाक्यात कर्त्याच्या लिंग, वचन, पुरुषाप्रमाणे क्रियापदाचे रूप आहे; परंतु या वाक्यात कर्म नसल्यामुळे 'जातो' हे अकर्मक क्रियापद आहे, म्हणून हा अकर्मक कर्तरी प्रयोग होय.

**अभ्यास :**

पुढील वाक्यांतील सकर्मक, अकर्मक प्रयोग ओळखा.

१. अब्दुल कानाला मफलर गुंडाळत होता.
२. कितीतरी बायका बांगड्या भरायला येतील.
३. खुर्च्यांवर काही पाहुणे मंडळी बसली होती.
४. गाडगेमहाराज खापरातून पाणी प्यायचे.





# १२. अभ्यास : एक छंद

**पु. ल. देशपांडे** (पुरुषोत्तम लक्ष्मण देशपांडे : जन्म १९१९-२०००) प्रख्यात विनोदी लेखक, नाटककार व संपन्न व्यक्तिमत्त्व असलेले बहुरूपी कलावंत. साहित्य, चित्रपट, रंगभूमी, संगीत अशा विविध कलाक्षेत्रांत भरीव कामगिरी. 'खोगीरभरती', 'बटाट्याची चाळ' इत्यादी विनोदी लेखसंग्रह; 'तुझे आहे तुजपाशी', 'तुका म्हणे आता' इत्यादी नाटके; 'व्यक्ती आणि वल्ली', 'गणगोत' ही व्यक्तिचित्रणे प्रसिद्ध. भारत सरकारची 'पद्मश्री' ही पदवी. पुणे विद्यापीठाने १९८० साली त्यांना डी. लिट. ही पदवी देऊन त्यांचा सन्मान केला आहे.

१९७५ साली पु. ल. नी आकाशवाणीवर शालेय कार्यक्रमात भाषण केले होते. तेच भाषण येथे दिले आहे.

पु. ल. नी भाषणातून विद्यार्थ्यांशी केलेले हितगुज आजच्या विद्यार्थ्यांनाही अत्यंत उद्बोधक आणि उपयुक्त वाटेल अशी खात्री वाटते.

''माझ्या विद्यार्थी मित्रांनो,

मला तुमच्याशी बोलायची संधी मिळते आहे याचा खूप आनंद झाला. एकच गोष्ट जराशी खटकली, ती म्हणजे मी इथं बोलत असताना तुम्ही मला दिसत नाही आणि मी तुम्हांला दिसत नाही. मी तुम्हांला दिसलो नाही म्हणून फारसं बिघडत नाही. तुमच्या आवडत्या सिनेनटासारखा मी देखणाही नाही. पोशाखबिशाखाच्या बाबतीतही ही कानगोष्ट आहे म्हणूनच सांगतो, जरासा गबाळाच आहे. आताच माझ्या लक्षात आलंय, की मी माझ्या बुशकोटाचं चौथं बटन तिसऱ्या काजात खुपसून तिसऱ्या बटनाला वाऱ्यावरच सोडलं आहे.

पण ते काही का असेना, तुमच्याशी बोलताना माझं काही चुकलं नाही म्हणजे झालं. शिवाय समर्थांनी म्हटलंच आहे, की वेष असावा बावळा. माझ्या अंगी नाना कळा काही नाहीत, तरीही 'वेष असावा बावळा, परि अंगी असाव्या नाना कळा' हे समर्थांचं वचन मी इमानानं पाळत आलो आहे.

तेव्हा तुमच्याशी बोलताना शेक्सपिअरच्या ज्युलियस सीझर नावाच्या नाटकातला मार्क अँटनी म्हणतो तसं मीही थोडासा फरक करून म्हणेन, 'मित्र

हो, भारतीय हो आणि बालनागरिक हो, जरा तुमचे कान इकडे करा.' मी शाळेत होतो त्या वेळी जेव्हा माझे गुरुजी 'इकडे कान कर' म्हणायचे, त्या वेळी ते काही निराळ्या कारणाने म्हणत असत. त्या अर्थानं नाही म्हणत मी... मी काय सांगणार आहे ते ऐकाल का? अशी विनंती करण्यासाठी म्हणतो आहे — माझ्या बालमित्रांनो आणि मैत्रिणींनो जरा इकडे कान द्या.

खरं सांगायचं म्हणजे तशी आपली अगदीच ओळख नाही असं नाही. कदाचित माझी संपूर्ण पुस्तकंही तुमच्यापैकी काहीजणांनी आणि काहीजणींनी वाचली असतील. म्हणजे यापूर्वी मी तुमच्याशी पुस्तकांतून बोललो आहे. लेख लिहिणं म्हणजे दुसरं काय? पुस्तकांतून तुमच्याशी बोलणंच की नाही? माझी गोष्ट सोडा. मी फार थोर लेखक नाही, पण तुमच्याशी पुस्तकांतून निरनिराळ्या विषयांवर किती थोर माणसं बोलत असतात. संत ज्ञानेश्वर बोलतात, तुकाराम महाराज बोलतात, सानेगुरुजी बोलतात, जोतिबा फुले, टिळक, आगरकर, हरी नारायण आपटे, गडकरी, केशवसुत, बालकवी असे संत, विचारवंत, कादंबरीकार, नाटककार, कवी तुमच्याशी बोलत असतात. वास्तविक ही माणसं आज आपल्यात नाहीत. तरी त्यांचं बोलणं मृत्यूसुद्धा थांबवू शकला नाही. तुम्ही एखाद्या थोर लेखकाचा धडा म्हणून जेव्हा वाचता तेव्हा तुमच्या लक्षात हे आलंय का, की आपण एका थोर माणसाच्या सहवासात आहोत? हे तुमच्या लक्षात केव्हा येईल ठाऊक आहे? तुम्ही ज्या वेळी पुस्तक हे थोरांना भेटण्याची संधी आहे या दृष्टीनं ते हाती घ्याल तेव्हा.

परीक्षेला पुस्तक नेमलंय म्हणून वाचलं पाहिजे अशा भावनेनं जर तुम्ही पुस्तक हातात धरलंत तर त्या लेखकाशी तुमचा संवादच सुरू होणार नाही. कादंबरी असो किंवा अगदी रुक्ष वाटणारं भूगोलाचं पुस्तक असो. कुणीतरी आपल्याशी केलेली ही कानगोष्ट आहे. कुणी आपल्याला खूप आवडलेली माहिती खूप हौसेनं देतो आहे, अशा भावनेनं जर आपण ते हाती धरलं नाही, तर तुमचा संवादच सुरू होणार नाही.

एखादी कविता तुम्ही वाचत असताना एकदम म्हणता की नाही 'वा! वा! काय छान आहे ही ओळ!' एखादी विनोदी कथा वाचताना खुदकन हसता की नाही? अशा वेळी आई विचारत असते, 'काय रे मधू, एकट्यानंच

हसायला काय झालं?' त्या वेळी आपण वरवर पाहणाऱ्याला एकटेच आहोत असे वाटत असतं; पण आपण एकटे असतो काय? आपल्याशी चिं. वि. जोश्यांचे चिमणराव बोलत असतात. गडकऱ्यांचे बाळकराम ठकीच्या लग्नाची कथा सांगत असतात. आईला बिचारीला कसं कळणार, की तुम्ही त्या वेळी थोर विनोदी लेखकाशी कानगोष्टी चालवल्या आहेत ते?

नव्या सत्राच्या आरंभी तुम्हांला सांगायची मुख्य गोष्ट ही, की गणिताच्या काय, भूगोलाच्या काय किंवा भाषा विषयाच्या काय, कुठल्याही पुस्तकाच्या सहवासात तुम्ही असताना एखाद्या मित्राच्या सहवासात आणि तेदेखील आपल्यापेक्षा ज्यानं खूप निरनिराळ्या गोष्टींचा अनुभव घेतलाय अशा मित्राच्या सहवासात आता दोन-चार तास काढणार आहोत असे समजावे. म्हणजे जे पुस्तक उगीचच तुम्हांला परीक्षेची भीती घालत येतं, ते तुमच्या मित्रासारखं तुम्हांला वाटेल.

पोहता न येणाऱ्या मुलांना पाण्याची भीती वाटते; पण एकदा पाण्याशी मैत्री केली, ते पाणी आपण त्याच्यावर कसे हातपाय मारले असताना हवे तितका वेळ उचलून धरतं हे कळलं, की सुट्टी लागल्याबरोबर आपण तलावाकडे किंवा नदीकडे एखाद्या मित्राच्या घरी जावं तशी धूम ठोकतो की नाही? सुरुवातीला जातं थोडं नाकातोंडात पाणी. पुस्तकांचं तसंच आहे. कधी कधी हा लेखक काय बरं सांगतोय ते कळतच नाही... अशा वेळी नाकातोंडात पाणी जातं म्हणून पाण्याशी वैर करणाऱ्या भित्र्या मुलासारखं तुम्ही पुस्तकाशीच वैर केलंत, तर त्या मुलाला जसा मस्त सूरबीर मारून पोहण्याचा आनंद मिळत नाही, तसा तुम्हांलाही ज्ञानाचा आनंद मिळणार नाही.

मी कशाचा आनंद म्हणालो? ज्ञानाचा आनंद नाही का? थोडासा जड वाटला ना शब्दप्रयोग? तसा तो जड नाही. 'ज्ञान' म्हणजे काहीतरी कठीण गोष्ट आहे अशी आपली उगीचच समजूत करून दिलेली असते. साध्या भाषेत सांगायचं तर ज्ञानाचा आनंद म्हणजे 'अरेच्च्या! आपल्याला कळलं' असे वाटून होणारा आनंद! मग तो एखाद्या यापूर्वी कधी न ऐकलेल्या शब्दाचा असेल.., न सुटणारं गणित सुटल्यावर होणारा असेल किंवा एखाद्या संगीतातला राग ओळखता आल्यावर होणारा असेल.

तुम्ही सगळे विद्यार्थी आहात नाही का? विद्यार्थी म्हणजे तरी काय? विद् म्हणजे जाणणे, कळणे; अर्थी म्हणजे इच्छा असलेला. ज्याला काही कळून घेण्याची इच्छा आहे तो विद्यार्थी. आता काही कळून घ्यावं अशी ज्याला इच्छाच नसेल तो मात्र केवळ शाळेत जातो आणि हजेरीपटावर नाव आहे म्हणून त्याला विद्यार्थी म्हणता येईल का?'नाही'म्हणून तुम्ही माना हालवल्यात ते दिसलं बरं का मला. तेव्हा शाळेत आला आहात ते आपल्याला जे जे काही या जगात दिसतं त्यामागचं रहस्य काय आहे बुवा, ते कळावं म्हणून आला आहात.

या जगात लाखो वर्षांपासून माणसांचं येणं आणि जाणं चालूच आहे. जन्मल्यापासून जास्तीत जास्त शंभर वर्षांपर्यंत माणसाला या जगात मुक्काम ठेवता येतो. आता मी तुमच्याशी बोलत असताना देखील ट्यँ... ट्यँ... असा आवाज करत काही नवे रहिवासी आले असतील. मी किंवा तुमचे आईवडील, तुमचे गुरुजी, तुमच्या आधी काही वर्षे इथं आलो. त्या आधीही काही माणसं आली. आधी जी माणसं आली त्यांनी या जगात तुमच्यापेक्षा जास्त वर्षं काढल्यामुळे तुमच्यापेक्षा त्यांना अधिक गोष्टी कळल्या आहेत. तुम्हांला अजून पुष्कळ गोष्टी कळायच्या आहेत. तुम्हांला ज्या गोष्टी कळलेल्या नाहीत किंवा समजायला अवघड जातात त्या समजावून देण्यासाठी तुमचे शिक्षक असतात.

आता तुम्हांला एखादी नवीन माहिती नेमकी कळली, की कळली नाही हे त्यांना कसं कळायचं? आपल्यापरीनं ते तुम्हांला वर्गात शिकवून सांगतात. मध्येच प्रश्न विचारतात. तुमच्या उत्तरावरून त्यांना कळतं, की तुम्हांला नीट कळलंय की कळलं नाही ते; पण एवढ्या मोठ्या वर्गात सगळ्यांनाच प्रश्न विचारणं शक्य नसतं. अशा वेळी 'गुरुजी मला कळलं नाही' हे सांगण्याचं तुमच्यात धैर्य पाहिजे.

'अज्ञान' असणं यात काहीही चूक नाही; पण 'अज्ञान' लपवण्यासारखी चुकीची गोष्ट दुसरी कुठलीही नाही. विशेषतः कळण्याची इच्छा मनात बाळगून येणाऱ्या तुमच्यासारख्या विद्यार्थ्यांनी 'आपल्याला कळलं नाही' हे न सांगणं हा तर मी म्हणेन एक प्रकारचा अपराध आहे. न्यूटनसारखा एवढा थोर वैज्ञानिक म्हणाला होता ना, की वाळवंटातल्या एका वाळूच्या कणाएवढीही मला विज्ञानाची

ओळख पटली नाही म्हणून. मग तुम्हा-आम्हांला कसली लाज! आपल्याला कळलं नाही की सरळ न घाबरता हात वर करावा आणि म्हणावं 'सर, मला इथपर्यंतच कळलं. इथून पुढलं नाही लक्षात आलं.' चांगल्या शिक्षकांना असले प्रश्न विचारणारा विद्यार्थी फार आवडतो आणि चांगले शिक्षक एखाद्या विद्यार्थ्यानं विचारलेल्या प्रश्नाचं नेमकं उत्तर ठाऊक नसलं तर स्पष्टपणानं सांगतात, 'हे पाहा, मलादेखील या प्रश्नाचं नेमकं उत्तर ठाऊक नाही; पण मी ग्रंथालयातून या विषयावर लिहिलेली पुस्तकं वाचून तुला उद्या उत्तर सांगेन.' विषयाला धरून प्रश्न विचारल्यावर विद्यार्थ्याला चांगले शिक्षक 'गप्प बस' असं कधीच सांगत नसतात.

तसं पाहायला गेलं तर आपण सगळे विद्यार्थीच आहोत. शाळेतलं शिक्षण संपल्यावर जर सगळ्यांनी नवीन माहिती मिळवायचं सोडून दिलं असतं तर जगात कधी प्रगती झाली असती का? हे जग इतक्या अजब अजब गोष्टींनी भरलं आहे,की त्यांतल्या एखाद्या गोष्टीचा थांगपत्ता लावायचा म्हणजे वयाच्या साठाव्या आणि सत्तराव्या वर्षीसुद्धा विद्यार्थ्यांसारखंच त्या गोष्टीचा अर्थ समजून घ्यायच्या मागे लागावं लागतं. मोठे गवई रोज पाच-पाच, सहा-सहा तास गायनाची मेहनत करत असत, हे ठाऊक आहे का तुम्हांला? अहमदजान तिरखवाँसाहेब नावाचे आपल्या देशातले फार मोठे तबलजी. ते सांगत होते, की दहा-दहा, पंधरा-पंधरा तास त्यांचा सराव चालायचा. मी म्हणालो, ''खाँसाहेब, तुम्हांला कंटाळा येत नसे का हो?'' ते मला म्हणाले, ''अरे बेटा, माशाला कधी पोहायचा कंटाळा येतो का?'' नव्वदाव्या वर्षीही ते तीस वर्षांच्या तरुणासारखा तबला वाजवत.

सांगायचा मुद्दा काय, एखाद्या गोष्टीचं रहस्य काय आहे हे समजून घेण्यासाठी तुम्ही त्याच्या मागे लागलात, की तो अभ्यास हासुद्धा एक खेळ होतो. मी तुम्हांला अभ्यासाच्या बाबतीत आणखी एक गुपित सांगणार आहे. पुष्कळदा आपल्याला वाटतं, की अमुक एक विषय आपल्याला आवडत नाही. समजा तुम्हांला वाटलं, इंग्लिश आपल्याला आवडत नाही. फार अवघड आहे. मग तोच विषय पकडा. बघू कशी माझ्याशी दोस्ती करत नाही तो, म्हणून त्याच्या मागे लागा. त्या भाषेच्या काय काय खोडी आहेत त्या लक्षात

घ्या... त्या शब्दांशी थोडक्यात म्हणजे मैत्री जमवा. यासाठी पहिली गोष्ट म्हणजे गुणांचा हिशेब विसरून जा. शंभरापैकी पस्तीस गुण मिळाले, की पास करतात म्हणून उरलेल्या पासष्ट गुणांचं अज्ञान तुम्ही खपवून घेत असलात, तर मग तुम्ही खरे विद्यार्थीच नव्हे.

तुम्ही एखादयाशी दोस्ती जमवता म्हणजे काय? त्याच्या फक्त नाकाशीच दोस्ती जमवता? किंवा हाताशीच जमवता? तुमचा दोस्त तुमच्या घरी न येता त्याने नुसत्याच आपल्या चपला पाठवल्या तर चालेल तुम्हांला? नाही चालणार. तो संपूर्णपणाने तुमच्या घरी यायला हवा. तसंच विषयाचं आहे. तुमच्या पुस्तकाशी तुमचा संपूर्ण परिचय हवा. भूगोलाच्या पुस्तकातली पस्तीस गुणांपुरतीच पानं पाठ केली असं म्हणणं म्हणजे भूगोलाशी तुम्ही दोस्तीच केली नाही म्हणण्यासारखं आहे.

हल्ली मुलींना गृहशास्त्र हा विषय असतो. त्यात भात-भाजी-वरण-पोळी-चटणी वगैरे स्वयंपाक करायचं शिक्षण असतं. आता गृहशास्त्रातली एखादी मुलगी म्हणाली, की १०० पैकी ३५ गुणांना पास ना, मग मी आपली नुसतंच वरण आणि चटणी करायचं शिकेन. म्हणजे वरणाचे पंचवीस आणि चटणीचे दहा मिळाले की पास; पण मग ती पुढे तिच्या घरी पाहुणे येतील, त्यांना काय वरण आणि चटणी वाढून 'हं, करा जेवायला सुरवात' म्हणणार?



तुम्हांला नेमलेलं नवीन पुस्तक आलं, की खरं तर कळो, न कळो ते अधाशासारखं वाचून काढलं पाहिजे. एखादया कवीची पाठ्यपुस्तकातली कविता तुम्हांला आवडली तर त्या कवीच्या आणखी कविता तुम्ही वाचायला हव्यात. आईने बशीत एकच करंजी दिली, की बाकीच्या करंज्या कुठल्या डब्यात ठेवल्या आहेत, ते हळूच पाहून ठेवता ना तुम्ही? मग एक कविता आवडली, की बाकीच्या कविता कुठल्या पुस्तकात असतील हे शोधून काढायला काय हरकत आहे?

तुमच्यापैकी कितीतरी मुलांना पोस्टाची तिकिटं गोळा करायचा, काड्याच्या पेट्यांवरची चित्रं गोळा करायचा छंद असतो. अभ्यास हासुद्धा छंद झाला पाहिजे, तरच शिकणं हा आनंदाचा भाग होऊन जाईल. अभ्यास करणं हे कोडी सोडवण्यासारखंच आहे. कोडं सुटत नाही तोपर्यंत कठीण. ते सुटणार नाही म्हणून हातपाय गाळून बसणं, हे तर भ्याडपणाचं लक्षण आहे.

हिमालयाचं शिखर चढून जाणाऱ्या एका गिर्यारोहकाला एकानं विचारलं, "का हो, इतकी उंच शिखरं पाहून तुमची छाती दडपून जात नाही का? इतक्या उंच आपण कसं काय चढणार बुवा, या विचारानं तुम्हांला भीती वाटत नाही का?" तो म्हणाला, "पण मी कधी शिखराकडे पाहतच नाही. मी एक पाऊल टाकलं की दुसरं कुठं टाकायचं ते पाहतो. हातातल्या नकाशावर



माझं लक्ष असतं. होकायंत्रावर दिशा पाहतो. एक पाऊल चढलो की म्हणतो, शिखर एक पाऊल आलं जवळ आणि असं करता करता माझ्या लक्षात येतं, आलं शिखर!"

पुस्तकातल्या पानांचं तसंच आहे. कसलाही विषय असो. त्या पानांत संपूर्णपणे घुसा... एकेका-एकेका ओळीत काय मजा आहे ते पाहत चला... अडलात एखादया ठिकाणी की ठरवा. उद्या हे गुरुजींना विचारायचं, घरात कुणी वडील माणूस असलं तर त्यांना विचारा. आपल्यापेक्षा वरच्या वर्गातल्या एखादया अभ्यासात आनंद वाटणाऱ्या मुलाशी दोस्ती करा. तुमच्या लक्षातसुद्धा येणार नाही, की पुस्तकाचं शिखर तुम्ही केव्हा गाठलंत ते. तुम्हीच आठवा बरं—गेल्या वर्षी खालच्या इयत्तेत असताना तुम्हांला कठीण वाटलेलं गणित आता किती सोपं वाटतं ते. असंच पायरी-पायरीनं चढत जायचं असतं.

इंग्रजीसारख्या विषयात पोस्टाच्या तिकिटासारखा एक-एक शब्द गोळा करत गेलात आणि तुमचा आल्बम जसा तुम्ही पुन्हा पाहता तसा पाहत पाहत गेलात, की पाहा तुमची इंग्रजीशी दोस्ती जमते की नाही ते. मग शेक्सपिअर, डिकन्स, बर्नार्ड शॉ असले जगप्रसिद्ध लेखक, पत्र-मित्र असतात तसे तुमचे ग्रंथ-मित्र होतील. जी गोष्ट इंग्रजीची तीच गणिताची, विज्ञानाची, भूगोलाची आणि इतर विषयांची.

एखादयाशी मैत्री जमवण्याचा उत्तम उपाय म्हणजे आपण आपल्या मैत्रीचा हात त्याच्यापुढे करणं हा. तुमच्या कानात सांगण्यासारखी हीच कानगोष्ट आहे. खेळापासून ते गणितापर्यंत सगळ्यांशी मैत्री करा. म्हणजे पाहा, परीक्षा हा त्या सगळ्या मित्रांशी आपली जोरदार दोस्ती आहे, असा जगाला दाखवून देण्याचा आनंदाचा सोहळा होईल. या सोहळ्यात खूप यशस्वी व्हा... ही तुम्हां सर्वांना शुभेच्छा."

प्रश्न :

खालील प्रश्नांची थोडक्यात उत्तरे लिहा.

१. वक्ता तुमच्याशी आपली अगदीच ओळख नाही असे नाही, असे का म्हणतो ?
२. आपण वाचत असलेल्या पुस्तकाच्या लेखकाशी आपला संवाद केव्हा साधेल ?
३. ज्ञानाचा आनंद आपणांस केव्हा मिळू शकेल ?

४. माणूस आयुष्याच्या शेवटपर्यंत विद्यार्थी असतो, यासाठी पाठात कोणते विचार मांडले आहेत ?
५. अज्ञान लपवणे ही चूक होय, याचे स्पष्टीकरण पु. ल. देशपांडे यांनी कसे केले आहे ?

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. खालील विधानांतून लेखकाला काय सांगायचे आहे ? स्पष्ट करा.
   अ. वेष असावा बावळा, परि अंगी असाव्या नाना कळा, हे समर्थांचं वचन मी इमानानं पाळत आलो आहे.
   आ. माझे गुरुजी, 'इकडे कान कर' म्हणायचे, त्या वेळी ते काही निराळ्या कारणाने म्हणत असत.
   इ. पुस्तक हे थोरांना भेटण्याची संधी आहे.
   ई. अज्ञान लपवण्यासारखी चुकीची गोष्ट दुसरी कुठलीही नाही.
२. अभ्यासातील आनंद या विषयावर एक परिच्छेद लिहा.
३. शालान्त परीक्षेत उत्तम प्रकारचे यश मिळवलेल्या विद्यार्थ्याला भेटून त्याची अभ्यास करण्याची पद्धत समजून घ्या.
४. हा पाठ वाचून तुम्ही अभ्यासाबाबत काय करायचे ठरवलेत ते तुमच्या मित्राला पत्राद्वारे कळवा.

**व्याकरण :**

कर्मणी प्रयोग

मूळ वाक्य—मुलाने पेढा खाल्ला.

| क्र. | कोणता बदल करायचा | | कर्ता | कर्म | क्रियापद |
|---|---|---|---|---|---|
| १. | कर्त्याचे लिंग बदलू | (स्त्रीलिंगी) | मुलीने | पेढा | खाल्ला. |
| २. | कर्त्याचे वचन बदलू | (अनेकवचनी) | मुलांनी | पेढा | खाल्ला. |
| ३. | कर्माचे लिंग बदलू | (स्त्रीलिंगी) | मुलीने | बर्फी | खाल्ली. |
| ४. | कर्माचे वचन बदलू | (अनेकवचनी) | मुलाने | पेढे | खाल्ले. |

वरील पहिल्या व दुसऱ्या वाक्यांत कर्त्याचे लिंग, वचन बदलले तरी क्रियापदाचे रूप बदलत नाही. तिसऱ्या व चौथ्या वाक्यांत 'खाल्ला' हे क्रियापद कर्माच्या लिंग, वचनाप्रमाणे बदलते. म्हणजे या वाक्यातील क्रियापद कर्माच्या लिंग, वचनाप्रमाणे चालते, म्हणून हा कर्मणी प्रयोग होय.

**अभ्यास :**

खालील वाक्यांतील 'कर्ता', 'कर्म', 'क्रियापद' ओळखा.

१. आईने बशीत करंजी दिली.
२. रघुभैय्याने चिठ्ठी वाचली.



# १३. प्रायश्चित्त

**शरच्चंद्र दा. गोखले** (जन्म १९२५) दै. केसरीचे माजी संपादक, विविध विषयांवरील अनेक पुस्तके प्रकाशित.

श्रीमंत नारायणराव पेशव्यांच्या मृत्यूला श्रीमंत दादासाहेब हे जबाबदार होते. हे सिद्ध झाल्यावर त्यांना रामशास्त्रींनी देहान्त प्रायश्चित्त सांगून आपली न्यायबुद्धी व निःस्पृहता कशी दाखवली हे या नाट्यउताऱ्यातून स्पष्ट होते.

(दरबार - गणपती महाल. कोपऱ्यात गादी आहे. सनई-चौघडा वाजतो आहे.)

भालदार : हुजूरे आलम, रुस्तुमे दख्खन, दादासाहेब पेशवा की सवारी आ रही हैं, आस्ते निगा रखो...

दुसरा भाल. : श्रीमंत सरकार, परमप्रतापी दादासाहेब पेशव्यांची स्वारी येत आहे.

पहिला भाल. : सरकारे सलतनत, सितारे हिंद, समशेर बहादुर दादासाहेब पेशवा पधार रहे हैं। आस्ते कदम....

दुसरा भाल. : पृथ्वीपती दक्षिणाधीश, विक्रमवीर, दादासाहेबांची स्वारी येत आहे. आस्ते कदम....

दोन्ही भाल. : आस्ते कदम, निगा रखो मेहेरबान, आस्ते कदम.....

बापू : यावं, यावं श्रीमंत. सारी दरबारी मंडळी आपलीच वाट पाहत आहेत. श्रीमंत नारायणराव पेशव्यांच्या दुःखद अंतानंतर अनाथ झालेल्या या गादीचा आपण स्वीकार करावा आणि प्रजेला अभय द्यावं. (दादासाहेब बसतात.) आपण गादीवर आल्याकारणानं साऱ्या मराठी प्रजेचा आनंद ओसंडून जात आहे. साताऱ्याहून छत्रपतींच्याकडून सवडीनं वस्त्रं येतील. आपण तोपर्यंत ही वस्त्रं व हा शिरपेच स्वीकारून ठेवावा.

दादासाहेब : बापू, श्रीमंत नारायणरावांचा शेवट ज्या तऱ्हेनं झाला त्याबद्दल साऱ्यांनाच खंत वाटत आहे; परंतु वैयक्तिक दुःखात वाहून

जाऊन राज्यकारभाराकडे दुर्लक्ष करू पाहणं रास्त होणार नाही. आणि केवळ या इच्छेनंच आम्ही दुःखावेग आवरून आज दरबारात आलो. श्रीमंत नारायणरावांची आठवण झाली, की अजूनही... (डोळ्यांना शेला लावतात.)

रामशास्त्री : श्रीमंत, न आलेले अश्रू पुसायला शेला काय करायचा? त्याचा आडोसाच करायचा असेल तर गोष्ट वेगळी! तो भ्रमाचा पडदा दूर करून साऱ्या दरबाराला सांगा, की श्रीमंत नारायणरावांची अजूनही आठवण झाली की कसं वाटतं? सांगा, सांगा, श्रीमंत!

बापू : शास्त्रीबुवा, आपल्या म्हणण्याचा रोख दरबाराला समजला नाही.

रामशास्त्री : समजून घ्यायचेच नाही असा निश्चय असल्यावर समजणार तरी कसं ? झोपलेल्याला जागं करता येतं; पण न झोपताच झोपेचं सोंग घेतो त्याला जागं कोण करणार ? आणि म्हणूनच दरबाराला जागं न करता दादासाहेबांच्या अंतःकरणाला आवाहन करतो आहे. सांगा, श्रीमंत सांगा. श्रीमंत नारायणरावांची आठवण झाली की काय वाटतं ते सांगा.

दादासाहेब : शास्त्रीबुवा, काय सांगू मी ? नारायणरावाच्या अकस्मात झालेल्या मृत्यूमुळे मला स्वस्थ झोपसुद्धा लागत नाही.

रामशास्त्री : लागणार कशी? दादासाहेब, आठवा तो प्रसंग. श्रीमंत माधवराव पेशव्यांनी थेऊर मुक्कामी श्रीमंत नारायणरावांना आपल्या पदरात टाकलं आणि आपणही कनवाळू अंतःकरणाने नारायणरावांचा लेकरू म्हणून सांभाळ करीन असं अभिवचन दिलंत. आणि शेवटपर्यंत आपण ते कसोशीनं पाळलंत ना? मग मनाची चलबिचल का होते ?

दादासाहेब : शास्त्रीबुवा, शेवटपर्यंत मी न्यायानंच वागत आलो.

रामशास्त्री : पेशव्यांच्या गादीची परंपरा तशी आहे. थोरले बाजीराव, नानासाहेब पेशवे, सदाशिवराव भाऊ, माधवराव पेशवे साऱ्यांनी न्यायाचा आदर केला. या न्यायाला स्मरून सांगा, की आता रस्त्यानं मिरवणुकीनं येताना तुमच्यावर जी फुलं उधळली

गेली, जो गुलाल उधळला,ज्या निरांजनांच्या आरत्या ओवाळल्या गेल्या, त्यांत काय दिसलं ?

दादासाहेब : काय दिसलं ? काय दिसलं मला ?

रामशास्त्री : मी तेच विचारतो आहे. सांगा, तुमच्यावर उधळल्या गेलेल्या गुलालात श्रीमंत नारायणरावांच्या रक्ताचे थेंब दिसले नाहीत ? सांगा, ज्या निरांजनांच्या ज्योती उजळून स्वतःच्या कर्तृत्वाची ज्योत पाजळलीत, त्यात श्रीमंत नारायणरावांना दिलेल्या भडाग्नीच्या उसळणाऱ्या ज्वाला दिसल्या नाहीत ? सांगा, आहेराची तबके समोर आल्यावर त्यांवरचा शेला दूर करताच, ज्यांचा क्रूरपणाने निर्दय खून करण्यात आला त्या श्रीमंत नारायणरावांच्या विकल शरीराचे तुकडे तुकडे दिसले नाहीत ? सांगा, श्रीमंत, काय दिसलं तरी काय तुम्हांला ? असे बावरून जाऊ नका.

दादासाहेब : रामशास्त्री, आमच्या डोळ्यांपुढे दुःखानं अंधारी येत आहे !

रामशास्त्री : आली तर बरंच झालं. म्हणजे बाहेरचे डोळे बंद झाले तरी मनःश्चक्षू उघडतील आणि झाल्या गोष्टी स्पष्टपणानं दिसू लागतील. त्या दिवशी श्रीमंत नारायणराव वाड्यात आल्यानंतर, फितुरीच्या पापमार्गानं गारदी आत आले. वाटेत सापडेल त्याला नाहीसं करणाऱ्या रुद्र वडवानलाप्रमाणे ते कत्तल करत आत आले. हाच तो वाडा. याच त्या भिंती. प्राणावर बेतलं हे पाहताच श्रीमंत नारायणराव धावत धावत आले आणि त्यांनी तुमच्या कमरेला मिठी घातली. कारण तुम्ही त्यांचे कनवाळू काका होतात ना ? प्रत्यक्ष पोटच्या पोरासारखं तुमचं त्यांच्यावर प्रेम होतं ना ? ते लेकरू तुमच्या कमरेला मिठी मारून बसलं. मागे नंग्या तलवारी घेऊन गारदी उभे होते. जीवन आणि मृत्यू यांच्या संगमावर आपण उभे होतात आणि प्राण पिळवटून नारायणराव ओरडले. (पडद्यात 'काका, मला वाचवा',) सांगा, सांगा दादासाहेब, त्या वेळी तुमचं प्रेम कुठं गेलं होतं ? त्या वेळी तुमचा न्याय कुठं गेला होता ?

(दादासाहेब कपाळाला हात लावून बसतात.)

बापू : शास्त्रीबुवा, बस झाला हा पोरखेळ. श्रीमंत नारायणरावांच्या मृत्यूमुळे दादासाहेबांच्या चित्तवृत्ती दुखावल्या गेल्या आहेत. आपण जरा सबुरीनं घ्या.

तुळाजी : बापू सबूर कसली करता ? खुद्द पेशव्यांच्या दरबारात हे शास्त्रीबुवा दादासाहेबांना खुनी ठरवण्याचा प्रयत्न करत आहेत.

सुमेरसिंग : बडे ताज्जुबकी बात है – कि आप आम दरबारमें खुद्द पेशवे सरकार के बारेमें बकते रहें और हम चुप रहके सुनें।

तुळाजी : शास्त्रीबुवा, आपण मोठे न्यायाधीश असाल, पण दादासाहेब खुद्द पेशवे आहेत आणि पेशव्यांच्या न्यायीपणाचा लौकिक दशदिशांत पसरला आहे. ज्याला फिर्याद गुदरायची असेल त्याने ती खुशाल गुदरावी. मग चौकशी करून न्याय करण्यात येईल.

रामशास्त्री : बापू, फिर्याद कुणी गुदरायची आणि न्याय कुणी करायचा ? या वाड्यात खुद्द पेशव्यांचा खून होतो आणि त्याची फिर्याद करायला लागते ? भीष्म-द्रोणांसारखे तुम्ही धुरंधर मुत्सद्दी कौरवांच्या दरबारात बसल्यासारखे स्वस्थ का ? तुम्हांला बोलता येत नसलं तरी या खांबांना बोलता येतं ! या शनिवारवाड्याला बोलता येतं ! तो हजार जिव्हांनी ओरडून सांगेल की नारायणराव पेशव्यांचा खून झाला तो गारद्यांनी केला ! आणि त्याला कारण म्हणजे परमप्रतापी पेशव्यांच्या गादीवर बसलेले हेच दादासाहेब.

दादासाहेब : शास्त्रीबुवा !

बापू : शास्त्रीबुवा ! आपण खुद्द पेशव्यांच्या विरुद्ध आरोप करत आहात !

तुळाजी : जीभ आहे म्हणून बडबडून इथं भागणार नाही ! आपण न्यायाधीश म्हणून आतापर्यंत गय केली. यापुढे ती होणार नाही. दादासाहेब पेशव्यांच्या विरुद्ध अपशब्द उच्चारणाऱ्याची गर्दन उतरवली जाईल.

रामशास्त्री : खुशाल उतरवा! त्यामुळे केवळ माझं तोंड बंद होईल, जनतेचं नाही! जनताजनार्दनाला न्यायदेवता सांगेल, की या गादीवर बसण्याचा दादासाहेबांना अधिकार नाही! कारण ते खुनी आहेत.

सुमेरसिंग : अब एक लब्ज भी निकालोगे तो जान खतरेमें रहेगी।

तुळाजी : शास्त्रीबुवा, आपण पेशव्यांना खुनी म्हणून दरबारचा अपमान करता आहात. त्याबद्दल पुरावा दाखवा. नाहीतर याच समशेरीला बळी पडाल. (तलवार काढतो.)

रामशास्त्री : तुळाजी! मी न्यायाधीश आहे. पुराव्यावाचून मला बोलायची सवय नाही. आणि पुरावाच पाहिजे असेल तर हा आपला हुकूम पाहा. (हुकूम त्याला दाखवतो.) नीट डोळे उघडून वाचा. 'श्रीमंत नारायणराव पेशवे यांस मारावे' हा हुकूम वाचा आणि त्याखालची दादासाहेब, आपली सही पाहा आणि खुनी कोण आहे ते सांगा!





| | | |
|---|---|---|
| तुळाजी | : | (घाबरून) शास्त्रीबुवा, हा हुकूम कसला? कुठं मिळाला? कोणी दिला? |
| रामशास्त्री | : | तुळाजी, असे घाबरू नका. नीट पाहा.आजवर श्रीमंत नारायणराव पेशवे यांना मारण्याचा तो हुकूम होता. आता तुमच्या मरणाचं ते बोलावणं आहे. |
| दादासाहेब | : | शास्त्रीबुवा, झाली चूक होऊन गेली ! राज्याकरता मी पदर पसरतो.यातून आम्हांला वाचवा! याला काही का तोड नाही? |
| बापू | : | शास्त्रीबुवा, तुमच्या न्यायबुद्धीवर आमचा विश्वास आहे. आपल्या विद्वत्तेचा आम्हांला आधार आहे. काही शास्त्रवचन सांगा. याला काहीच का तोड नाही ? याला काही प्रायश्चित्त आहे ? |
| रामशास्त्री | : | आहे, याला प्रायश्चित्त आहे. |
| दादासाहेब | : | सांगा, कसलंही प्रायश्चित्त सांगा. ते आम्ही घेतो. दक्षिणा, अन्नदान, यात्रा काहीही सांगा! सारा खजिना ओततो. सारी शक्ती खर्च करतो, पण ही मानहानी थांबवा ! याला प्रायश्चित्त सांगा. |
| रामशास्त्री | : | याला एकच प्रायश्चित्त ! |

दादासाहेब : सांगा, सांगा, कोणतं प्रायश्चित्त......?

रामशास्त्री : देहान्त प्रायश्चित्त !

दादासाहेब : काय ?

रामशास्त्री : होय. देहान्त प्रायश्चित्त ! न्यायाधीश म्हणून आजवर इथं वागलो. माझ्या अल्पमतीप्रमाणं न्यायदान केलं. हाच माझा अखेरचा निवाडा ! त्याची अंमलबजावणी करणं न करणं तुमचं काम ! आम्ही चाललो, पण हे लक्षात ठेवा, ज्या क्षणी न्यायदेवतेला धिक्कारून तुम्ही नारायणरावांचा खून केलात त्याच क्षणी आपल्या पेशवाईच्या अस्ताला आरंभ झाला. आम्ही जातो. जिथं न्याय नाही तिथं रामशास्त्री नाही ! कारण जिणं जगायचं तर न्यायानं, नाहीतर मरण कवटाळायचं, हाच महाराष्ट्राचा जीवनधर्म आहे.

प्रश्न :

अ. खालील प्रश्नांची प्रत्येकी सात ते आठ वाक्यांत उत्तरे लिहा.

१. बापूंनी दरबारात दादासाहेबांचे स्वागत कोणत्या शब्दांत केले ?
२. नारायणरावांच्या खुनाचा प्रयत्न कोणत्या प्रकारे करण्यात आला ?
३. रामशास्त्री यांनी पेशव्यांच्या दरबारातून निघून जाण्याचा निर्णय का घेतला ?

**ब.** खालील प्रश्नांची प्रत्येकी दोन ते तीन वाक्यांत उत्तरे लिहा.

१. तुळाजी शास्त्रीबुवांना कोणती धमकी देतो ?

२. दादासाहेबांवर केलेला आरोप सिद्ध करण्यासाठी रामशास्त्रींनी कोणता पुरावा दाखवला ?

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. पूर्वीच्या व सध्याच्या न्यायदान पद्धतीत साम्य आहे का, हे या पाठाच्या आधारे सहा ते सात वाक्यांत लिहा.

२. आवाहन करणे, पदर पसरणे, अभिवचन देणे, भ्रमाचा पडदा दूर करणे यांचा वाक्यांत उपयोग करा.

३. शरच्चंद्र गोखले यांचे 'प्रायश्चित्त' हे नाटक मिळवून वर्गात वाचन करा.

**व्याकरण :**

भावे प्रयोग

शिक्षकाने मुलास शिकवले.

| क्रम | कोणता बदल करायचा? | कर्ता | कर्म | क्रियापद |
|---|---|---|---|---|
| १. | कर्त्याचे लिंग बदलू (स्त्रीलिंगी) | शिक्षिकेने | मुलास | शिकवले |
| २. | कर्त्याचे वचन बदलू (अनेकवचनी) | शिक्षकांनी | मुलास | शिकवले |
| ३. | कर्माचे लिंग बदलू (स्त्रीलिंगी) | शिक्षकाने | मुलीस | शिकवले |
| ४. | कर्माचे वचन बदलू (अनेकवचनी) | शिक्षकाने | मुलींना | शिकवले |
| ५. | कर्त्याचा पुरुष बदलू (प्रथमपुरुष) | मी | मुलास | शिकवले |
| ६. | कर्माचा पुरुष बदलू (द्वितीय पुरुष) | शिक्षकाने | तुला | शिकवले |

वरील वाक्यांवरून असे आढळून येते, की कर्त्याचे किंवा कर्माचे लिंग, वचन व पुरुष बदलले तरी क्रियापदाच्या रूपात काहीच बदल होत नाही. म्हणजे या वाक्यांत क्रियापद हे कर्ता किंवा कर्म यांच्याप्रमाणे चालत नसून ते स्वतंत्र आहे, म्हणून हा **भावे प्रयोग** होय.

भावे प्रयोगात क्रियापद नेहमी नपुसकलिंगी एकवचनी व तृतीय पुरुषी असते.

**अभ्यास :**

खालील वाक्यांतील प्रयोग ओळखा.

१. सुरेखाने गाणे म्हटले.

२. पोलिसांनी चोरास पकडले.

३. हैबतने बैलास बांधले.



# १४. माझे तीर्थरूप

**मधुकरराव धनाजी चौधरी** (जन्म : १९२८) समाजकारण, राजकारण आणि शिक्षण क्षेत्रातील मान्यवर व्यक्ती म्हणून महाराष्ट्राला परिचित. १९४२ च्या स्वातंत्र्य संग्रामात १४ व्या वर्षी सहभाग. राष्ट्रसेवादलाचे कार्यकर्ते. सामाजिक, राजकीय व शिक्षण क्षेत्रातील कार्यकर्तृत्वामुळे त्यांना अनेक राष्ट्रीय पुरस्कार प्राप्त.

प्रस्तुत पाठात लेखकाने आपल्या बालपणीच्या आठवणीतून धनाजी चौधरी यांच्या संपन्न व्यक्तिमत्त्वाचा परिचय करून दिला आहे.

एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धात खानदेशमधील सातपुडा पर्वताच्या पायथ्याशी असलेल्या खिरोदा (क्षीरोदक) या लहानशा खेड्यातील एका शेतकरी कुटुंबात धनाजी चौधरी यांचा जन्म झाला. अज्ञान, गरिबी, रूढी व परंपरा यांचा पगडा असलेले, दळणवळणाच्या व शिक्षणाच्या सोई नसल्यामुळे इतर खेड्यांसारखे असलेले हे गाव. थोड्याशा कोरडवाहू शेतीवर काबाडकष्ट करून घरसंसार चालवणारे त्यांचे वडील कै. नाना रावजी चौधरी जेमतेम मराठी ५वी/६वी शिकलेले होते. ते स्वभावाने मोठे करारी, शिक्षणासंबंधी नितान्त आस्था असलेले आणि सुधारणावादी होते. त्यांनी आपल्या मुलांना उत्तमोत्तम शिक्षण मिळावे असा शिकस्तीचा प्रयत्न केला. जेथे चांगले शिक्षक, चांगले वातावरण असेल अशा ठिकाणी मुलांना ते शिक्षणासाठी पाठवत गेले. त्यामुळे भालोद, धुळे, पुणे अशा त्या काळी नावाजलेल्या ठिकाणी धनाजींचे प्राथमिक, माध्यमिक, महाविद्यालयीन शिक्षण झाले. त्यातूनच त्यांचे संस्कारक्षम मन घडत गेले.

त्या काळचे पुण्यातील वातावरण टिळक, आगरकर, महात्मा फुले, महर्षी शिंदे आदी पुरुषांच्या राजकीय व सामाजिक विचारांच्या आंदोलनांनी, तसेच हरी नारायण आपटे, केशवसुत, गडकरी आदी दिग्गज साहित्यिकांच्या सांस्कृतिक चळवळींनी भारलेले होते. मुळातच संस्कारक्षम असलेले माझ्या वडिलांचे मन

अधिक संवेदनशील, चिंतनशील व समाजाभिमुख बनू लागले. शिक्षणामुळे व वातावरणामुळे जागृत झालेले मन त्या कार्याकडे ओढ घेत होते; पण परिस्थितीचा रेटा उपजीविकेचे साधन शोधण्याची निकड लावत होता. मनाच्या अशा ओढाताणीत शेवटी महाविद्यालयीन शिक्षण अर्धवट (इंटरपर्यंत) सोडून त्यांनी फर्गसन कॉलेजला रामराम ठोकला. सरकारी नोकरीतून समाजसेवाही करता येईल आणि उपजीविकेचा प्रश्नही सोडवता येईल या समवयस्कांनी काढलेल्या निष्कर्षानुसार ते सरकारी नोकरीत दाखल झाले. पोलीसखात्यात नोकरीला असूनही 'देवमाणूस फौजदार' अशी ख्याती त्यांनी मिळवली; पण नोकरीतून समाजसेवाही करता येईल या कल्पनेबद्दल त्यांचा हळूहळू भ्रमनिरास होत गेला. महात्मा गांधींच्या नेतृत्वाखाली सत्याग्रहाच्या अपूर्व मार्गाने चालू झालेला स्वातंत्र्याचा लढा अधिकाधिक व्यापक होत होता. राष्ट्रप्रेमाने जनता पेटून उठत होती. परकीय सत्तेच्या जुलमी अत्याचाराविरुद्धचा असंतोष जसजसा अधिकाधिक स्फोटक बनत चालला तसतसा ब्रिटिश साम्राज्यशाहीच्या वरवंट्याखाली स्वातंत्र्यप्रेमी नागरिकांना चिरडून टाकण्यास जोर येत होता. त्या काळात माझे वडील अनेकदा अत्यंत क्षुब्ध मनःस्थितीत घरी परतायचे. कधी कधी तर स्वातंत्र्यप्रेमी बांधवांवर होणाऱ्या बेछूट अत्याचारांच्या बातम्या ऐकून ते ओक्साबोक्सी रडायचे. शेवटी मनाचा हा कोंडमारा असह्य झाला आणि त्यांनी आपल्या फौजदारकीचा राजीनामा सरकारकडे पाठवून दिला. 'सरकारी नोकरीचा त्याग केल्यानंतर लाभलेली मनःशांती अनिर्वचनीय होती. कित्येक वर्षांचा आंतरिक संघर्ष थांबला होता आणि भारताला मुक्त करण्यासाठी मी मुक्त झालो होतो', असे ते सांगायचे.

नोकरी सोडल्यामुळे उत्पन्नाचे साधन नव्हते. घरची परिस्थिती सर्वसाधारण. शेती १०-१२ एकर होती. चरितार्थासाठी ते शेती करू लागले. सालदाराबरोबर वखरणी, नांगरणी, पेरणी, कोळपणी, कापणी, मळणी, मोट वाहणे, बारे धरणे, गाड्यांवर बसून डोंगरातून गवताचे भारे आणणे ही सारी कष्टाची कामे करताना त्यांच्या चेहऱ्यावर निरलस आनंद मी पाहिला आहे. अन् शेतात झुणका-भाकरीची न्याहरी करत करत राष्ट्रीय लढ्याच्या उपक्रमांची दिलखुलास चर्चा करणाऱ्या वडिलांचे विलोभनीय दर्शन मला घडले आहे.

त्यांची राहणी अत्यंत साधी असे. फाटलेले धोतर किंवा उसवलेला सदरा

स्वतः रफू करण्यात त्यांना मनस्वी आनंद वाटे. सुरेख हस्ताक्षर काढणे आणि उत्तम रफू करणे या दोन कला त्यांच्या हातात होत्या. आम्हा मुलांना चांगले वळण लागावे यासाठी ते सदैव दक्ष असत; पण हे संस्कार हळुवारपणे आणि प्रेमाने व स्वतःच्या आचरणातून ते करत. त्यांचा दरारा वाटे. लहानपणी त्यांनी मला दोनदा मारल्याचे आठवते. ते घरात सूत कातत बसले होते. आम्ही ओसरीत बसून जेवण करत होतो. मला भाजी आवडली नाही, म्हणून मी आईला बोल लावू लागलो आणि पुढच्याच क्षणी एक चपराक माझ्या गालावर बसली. बाबा समोर उभे होते. मी अवाक् होऊन त्यांच्याकडे बघू लागलो. त्यांनी मला पूर्वी कधीच मारले नव्हते. क्षणात त्यांच्या चेहऱ्यावरील भाव बदलले आणि अतिशय हळुवार, मृदू शब्दांत मला म्हणाले, "बाळ, समोरच्या अन्नाला कधी वाईट म्हणू नये. तुमच्यासाठी रात्रंदिवस राबणाऱ्या आईला असं बोलू नये." त्यानंतर मी अन्नाला कधी दूषण लावले नाही.

स्त्रियांच्या बाबतीत ते अतिशय उदार व हळवे होते. आपल्या आईवर झालेल्या अन्यायाच्या अनुभवामुळे असेल अथवा मुळात अतिशय संवेदनशील मनावर शिक्षण काळात झालेल्या सुसंस्कारांमुळे असेल, स्त्रियांचे प्रश्न व त्या अनुषंगाने त्यांच्याकडे येणारी अनेक अवघड प्रकरणे सोडवताना त्यांचे उदात्त-उत्कट भाव प्रकट होत. माझी आई अशिक्षित होती; परंतु तिला साक्षर करण्यासाठी अनेक प्रकारचे चांगले साहित्य वाचून दाखवत. त्यांनी तिला सुसंस्कारित व खऱ्या अर्थाने सहधर्मचारिणी बनवले. त्यामुळे मोठ्या मानाची सरकारी नोकरी सोडल्यानंतर त्यांच्या जीवनात त्यांना तिची पूर्ण साथ मिळाली. आईबरोबर तिच्या वयाच्या, तिच्यापेक्षाही मोठ्या असलेल्या शेकडो अडाणी, अशिक्षित शेतकरी, कष्टकरी, प्रौढ स्त्रियांवर असे संस्कार करण्याचा प्रयत्न त्यांनी केला. स्त्रियांच्या प्रौढ साक्षरता वर्गास ते स्वतः शिकवत असत. आमच्या भागात अनेक स्त्रियांना त्यांनी हिंगणे येथील महिलाश्रमात पाठवले. माझ्या बहिणींना व इतर मुलींना औपचारिक शिक्षणाऐवजी वर्ध्याच्या संस्कारक्षम महिलाश्रमात ठेवणे पसंत केले. खरे म्हणजे, एकूण शिक्षणाबद्दलच त्यांना कमालीची आस्था होती.

शिक्षण सर्वांना मिळालेच पाहिजे असे त्यांना वाटे. यासाठी त्यांनी शाळा काढली. लोक तिला राष्ट्रीय शाळा म्हणत. कारण सर्वांच्या मुलांसाठी ती

खुली होती. म्हणजे असे, की ती सर्व जनतेसाठी खुली होती आणि जनतेच्या आश्रयावर ती चालत होती. या संस्थेद्वारे त्यांनी गांधीजींचे शिक्षणविषयक विचार व प्रयोग आपली स्वतःची भर घालून साकार करण्याचा प्रयत्न केला. निरनिराळ्या विषयांचे औपचारिक शिक्षण तर मिळायचेच; परंतु वैयक्तिक व राष्ट्रीय जीवन समृद्ध व सक्षम बनवणारे जीवनशिक्षण मिळायचे. शेतीकामे,





सफाई, सूतकताई, विणकाम, सुतारकाम, लोहारकाम, कागदकाम, चर्मोद्योग, मधुमक्षिका पालन, साबण बनवणे, तेल गाळणे, बगीचे तयार करून घेणे, त्यांची निगा राखणे, राष्ट्रीय सप्ताह पाळणे आदी कितीतरी उपक्रम इथे चालायचे. कामाशी गट्टी आणि सुट्यांना सुट्टी अशी होती ही अनोखी संस्था.

बालपणापासून ते अखेरच्या क्षणापर्यंत माझ्या वडिलांना असंख्य मित्र मिळाले. प्रत्येक अवस्थेत नवे नवे मित्र मिळत गेले. त्यांचे मित्र अनेक जाती-धर्मांचे होते. या सर्वांमध्ये दलितमित्र भाऊसाहेब बोंडे यांना मी अंतरंगातील मित्र, सहकारी आणि अनुयायी अशा विविध भूमिकांत बघितले आहे. दोघांच्या जीवनाचा सूर जुळला होता. त्यांच्या दोन शरीरांतून एकच आत्मा वावरतो आहे असे वाटे. कॉंग्रेस चिटणीसपद इत्यादी पदांपेक्षा समाजविकास कार्यात त्यांना आपले जीवितकार्य सापडल्यासारखे वाटे.

सामाजिक जबाबदारी शिरावर घेतल्यानंतर आदिवासी भागातील दऱ्याखोऱ्यांत हिंडणारे, गरीब दुबळ्या बांधवांशी समरस होणारे सेवक हवेत;म्हणून कार्यकर्त्यांची निवड करताना ते उमेदवाराला मुलाखतीसाठी बोलावत. कसोटी घेऊन मगच त्याची जबाबदारीच्या कामावर निवड करत. त्यामुळे स्वातंत्र्योत्तर काळातही त्यांच्याभोवती जिद्दीचे, सेवाभावी व पडेल ते काम करणारे कार्यकर्ते जमले.

त्यांच्या सेवाभावी वृत्तीमुळे आदिवासी बांधवांना ते आपले वाटत. आपल्या कार्यकर्त्यांना ते नेहमी सांगत, ''तुम्ही किती काम करता हे महत्त्वाचे नाही. जंगलातल्या गावी जाऊन, तुम्ही तेथे गाडून घेऊन काम करत राहिलात तर ते महत्त्वाचे आहे.'' या त्यांच्या कार्यपद्धतीमुळे त्यांना आदिम व भटक्या जमातींतूनही खूपसे कार्यकर्ते मिळाले व घरसंसार चालवत त्यांच्याबरोबर समाजाचे कार्य करू लागले. तिथे त्यांना आपले जीवितकार्य सापडल्यासारखे वाटे. त्यामुळे तिकडे जंगलातच आदिवासी बांधवांच्या सोबत जाऊन राहावे, असेही त्यांना वाटू लागले होते.

कॉलेजातून सुटीत घरी आलो, की ते सांगतील ती कामे मी करत असे. कधी शेतातील, कधी घरचे तर कधी सर्वोदय केंद्राचे काम. मला त्यांनी एकदा पत्राने आपले मनोगत कळवले. त्यांनी लिहिले होते, 'आता यापुढे घर-संसाराची अधिकाधिक जबाबदारी तुला उचलावी लागेल, कारण मी यापुढे जीवन (म्हणजे दुसऱ्यासाठी जगणे) जगण्याचे ठरवले आहे. तुझ्या उत्तराची वाट पाहतो.'

मी वर्ध्याहून त्यांना लिहिले, 'आता यापुढे मी सुट्यांमध्येदेखील घरी येणार नाही. आपली अवज्ञा करायची म्हणून नाही, तर मला जीवनाचे ध्येय निश्चित करण्याची ओढ लागली आहे. जीवन घडवण्यासाठी व जीवनदृष्टी मिळवण्यासाठी पुढील काही वर्षे द्यायची असे मी ठरवले आहे.'

एकुलत्या एका मुलाबद्दल त्यांच्या कितीतरी अपेक्षा असतील; परंतु माझे पत्र मिळाल्यानंतर लगेच त्यांचे उत्तर आले, 'तुझे पत्र वाचून समाधान झाले. तुझ्याबद्दलची चिंता मिटली. तू निश्चिंत मनाने आपल्या मार्गाने जा.'

पत्र वाचून माझे डोळे भरून आले.

**प्रश्न :**

पुढील प्रश्नांची प्रत्येकी तीन ते चार वाक्यांत उत्तरे लिहा.

१. नाना रावजी चौधरी यांनी धनाजींच्या शिक्षणासाठी कोणती काळजी घेतली ?
२. धनाजी चौधरी यांनी महाविद्यालयीन शिक्षण का पूर्ण केले नाही ?
३. अन्नाला दूषण लावू नये, हे मधुकररावांना केव्हा कळले ?
४. धनाजी चौधरींची शिक्षणाविषयीची आस्था कोणत्या कार्यातून दिसून येते ?
५. आपले जीवितकार्य सापडले, असे धनाजी चौधरी यांना केव्हा वाटले ?

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. असे कोणी, केव्हा व का म्हटले ? थोडक्यात लिहा.

अ. 'भारताला मुक्त करण्यासाठी मी मुक्त झालो होतो.'

आ. 'आता यापुढे मी सुट्यांमध्येदेखील घरी येणार नाही.'

२. धनाजी चौधरींच्या 'राष्ट्रीय शाळे'बद्दल दहा वाक्यांत माहिती लिहा.

३. शिक्षणाचे महत्त्व पटवून देणारे पत्र आपल्या गावाकडील मित्रास लिहा.

**व्याकरण :**

आम्ही जेवण करत होतो.

या वाक्यातील 'करत' या शब्दातील क्रिया आहे 'कर.' या मूळ धातूला 'त' हा प्रत्यय लागून 'करत' हा क्रियावाचक शब्द बनला. या क्रियावाचक शब्दांनी वाक्याचा अर्थ पूर्ण होत नाही. अशा प्रकारे धातूला प्रत्यय लागून क्रिया अपुरी आहे असे दाखवणाऱ्या शब्दांना **धातुसाधित** किंवा यालाच **कृदन्त** असेही म्हणतात.

वरील वाक्यात 'करत' हे धातुसाधित असून हे संयुक्त क्रियापद आहे व 'होतो' हे सहायक क्रियापद आहे.

कर या धातूपासून करणे, करत, करता, करताना, करू, करून, करणारा अशी धातुसाधितांची रूपे होतात. णे, त, ता, ताना, ऊ, ऊन, ला, वे हे प्रत्यय लागून त्यांची जी रूपे होतात त्यांना **धातुसाधिते** म्हणतात.

धातुसाधिते किंवा कृदन्ते वाक्यात नाम, विशेषण किंवा क्रियाविशेषण यांची कार्ये करतात. उदा. –

१. कालचं **गाणे** खूपच रंगले. (नाम)

२. तो रंगभूमीवर **गात** आला. (क्रियाविशेषण)

३. **गाता** गळा. (विशेषण)

**अभ्यास :**

खालील वाक्यांतील कृदन्त/धातुसाधिते ओळखा.

१. चांगल्या ठिकाणी ते मुलांना शिक्षणासाठी पाठवत गेले.

२. कष्टाची कामे करताना त्यांना आनंद होत असे.

३. मी त्यांच्याकडे बघू लागलो.

४. दोघांच्या जीवनाचा सूर जुळला होता.





# १५. लोखंडी नांगराचा जन्म

**शं. वा. किर्लोस्कर** (१८९१-१९७५) किर्लोस्कर प्रकाशनाचे संस्थापक. 'किर्लोस्कर', 'स्त्री' व 'मनोहर' या मासिकांचे आद्यसंपादक. लेखक व चित्रकार म्हणूनही प्रसिद्ध. कै. लक्ष्मणराव किर्लोस्कर यांचे चरित्र यांनी लिहिले आहे. 'यांत्रिकाची यात्रा' या पुस्तकातून हा पाठ घेतला आहे.

कुठल्याही क्षेत्रात माणसाला सहजासहजी यश मिळत नाही. त्यासाठी बऱ्याच खस्ता खाव्या लागतात. कल्पकता, प्रयोगशीलता आणि आत्मविश्वास यांच्या बळावर लक्ष्मणराव किर्लोस्कर यांनी अत्यंत प्रतिकूल परिस्थितीवर मात करून लोखंडी नांगर कसा तयार केला याची हकिकत या पाठात आहे.

पूर्वी लक्ष्मणराव किर्लोस्करांचे सायकलचे दुकान होते, पण त्याकडे त्यांचे दुर्लक्ष झाले होते. औंधहून बेळगावला आल्यावर मात्र लक्ष्मणराव किर्लोस्कर सायकलच्या दुकानाकडे पूर्ववत लक्ष देऊ लागले. या दुकानाच्या पिछाडीस एका लहान शेडमध्ये कडबा कापण्याची यंत्रे करण्याचे काम चाले. त्यामुळे किर्लोस्कर बंधूंच्या व्यवसायाला क्रमशः दुहेरी स्वरूप येत चालले.

हा प्रकार लक्ष्मणरावांस योग्य वाटेना. कारखानदार होऊ इच्छिणाऱ्याने त्याच एका उद्योगाला वाहून घेतले पाहिजे, पण आतापर्यंत ते जमले नाही; मात्र अनुकूल स्थिती येताच आता सायकलीचा धंदा बाजूस ठेवावा व कडबा कापण्याच्या यंत्राच्या जोडीला शेतकऱ्यांना लागणारे इतर एखादे साधन तयार करण्याचे काम हाती घ्यावे, असे त्यांनी योजले. बेळगावचे एक रहिवासी श्री. नाना देवल यांना १९०३ साली सायकलचे दुकान तीन हजार रुपयांस विकून ते मोकळे झाले व आपल्या पुढच्या खटपटीला लागले.

भारत हा शेतीप्रधान देश. या देशातील शेकडा ऐंशी लोक शेतीच्या उद्योगात गुंतलेले. तेव्हा त्यांना उपयुक्त व फायदेशीर होणारे एखादे नवे साधन आपण तयार केल्यास त्याला फार मागणी येईल, हा लक्ष्मणरावांचा कयास. असा कोणता माल आपल्यास तयार करता येईल? बरीच भवति न भवति केल्यावर त्यांनी लोखंडी नांगर तयार करण्याचा विचार केला.

मनुष्याला कुठल्याही क्षेत्रात यश मिळवण्यास बऱ्याच खस्ता खाव्या लागतात हे ठरलेले आहे. तथापि, या यशाचा उगम त्याच्या मनात स्फुरलेल्या एखादया सूक्ष्म कल्पनेपासून झालेला असतो, हेही तितकेच खरे. ही कल्पना हेच त्याच्या यशाचे बीज. नव्या कल्पनांचे समाजाकडून उत्साहाने स्वागत होईल असे काही तरी आपण केले पाहिजे. अंधळेपणाने जुन्या चाकोरीला चिकटून राहण्याची वृत्ती फार अनिष्ट. नव्या कल्पना काढण्याचे होतकरू तरुणांना धाडस होत नाही. यात त्या तरुणांचे अहित होते, तसेच साऱ्या समाजाचेही! आपला देश मागासलेल्या स्थितीत राहण्याचे कारण स्वतंत्र विचार करण्यास व नव्या कल्पना कृतीत आणण्यास आपण धजत नाही, हेच नव्हे काय ?

शेतीच्या सुधारलेल्या परदेशी औतांची अनेक माहितीपत्रके लक्ष्मणरावांनी चाळली. जमिनीच्या मशागतीसंबंधी शक्य ती सर्व माहिती त्यांनी गोळा केली. त्याच सुमारास शेतकी खात्याने काही विलायती नांगर आणवून ते इकडे कितपत यशस्वी ठरतात याबद्दल प्रयोग चालवले होते. याबाबतीत शेतकी अधिकाऱ्यांशी लक्ष्मणरावांनी पुष्कळ विचारविनिमय केला. हे सर्व झाल्यावर ज्या नमुन्याचा नांगर तयार करायचे लक्ष्मणरावांनी ठरवले तसला एक विलायती नांगर त्यांनी आणवला. या नांगराचे फाळ, पाठ, मधला भाग इत्यादी बिडाचे होते व हाळीस आणि रुमणे लोखंडी पट्ट्यांचे. हे नांगर तयार करायला बिडाची भट्टी हवी. ती अगोदर उभारली पाहिजे. संन्याशाच्या लग्नाला शेंडीपासून तयारी! लक्ष्मणराव त्या प्रयत्नाला लागले. माळावर आपल्या झोपडीशेजारीच त्यांनी एक छोटी भट्टी उभी केली. लोंढ्याहून मोल्डिंग सेंड व फायर क्ले आणवली. चार पोती कोक गोळा केला व साचे घालून ओतकामाला सुरुवात केली; परंतु या कामाचा अनुभव कुणाला? त्यातून बिडाची भट्टी म्हणजे एक मोठी विचित्र बाब! जरा वारा कमी झाला, किंवा रस काढण्यात किंचित विलंब झाला, की बिघडली भट्टी! सारा ख़टाटोप फुकट! पण लक्ष्मणराव असल्या सुरुवातीच्या अपयशांना थोडेच भीक घालणार! ते त्या भट्टीच्या खनपटीला बसले. ज्या चुका होत त्या दूर करण्याच्या युक्त्या अमेरिकन 'फौंड्री' मासिकाची पारायणे करून त्यांनी शोधून काढल्या. एवढे झाल्यावर आपल्या भट्टीतून नांगराचे भाग मनपसंत तयार होऊन बाहेर पडू लागले तेव्हाच ते स्वस्थ बसले.



माळावरच्या या चिमुकल्या कारखान्यात तयार झालेले पहिले सहा नांगर जोडून रंगवून तयार होताच त्याची वर्तमानपत्रातून जाहिरात फडकू लागली; पण हे नांगर कारखान्यातून हालण्याचे चिन्ह दिसेना. गिऱ्हाइकाचा पत्ता नाही ! फार काय, ते तसेच नेऊन आपल्या शेतावर प्रयोगादाखल वापरण्यासही कोणी शेतकरी पुढे येईना. एखाद्याला आग्रहाने बोलावून ते नांगर दाखवले म्हणजे तो त्याकडे संशयास्पद दृष्टीने पाही व म्हणे, 'आमच्या उपयोगी नाहीत हे नांगर! आमच्या वाडवडिलांनी असले नांगर कधी वापरले होते का? असल्या नांगरानं जमिनीत विष पसरायचं, नाहीतर जनावरांचे प्राण जायचे!' कशा दूर करायच्या त्यांच्या या अडाणी कल्पना ?

इतक्यात त्यांच्या माळाशेजारीच देवीची लस तयार करण्यासाठी एक संस्था स्थापन करायचे सरकारने ठरवले. त्याचे व्यवस्थापक मि. हचिन्सन मोठे उमद्या मनाचे गृहस्थ होते. लक्ष्मणरावांची कल्पकता व कार्यनिष्ठा पाहून त्यांना मोठा आदर वाटे. त्यांना इन्स्टिट्यूटसाठी लोखंडी टेबले, लस काढण्याची व टोचण्याची

हत्यारे आणि इमारतीसाठी शटर्स इत्यादी निरनिराळ्या मालाची जरुरी होती. त्या वस्तू पुरवण्याचे काम लक्ष्मणरावांनी पत्करले. त्यामुळे कारखान्याची तात्पुरती सोय झाली.

तथापि, कारखाना लहान असला तरी पुरेशा भांडवलाशिवाय त्याचा दैनंदिन कारभार सुरळीतपणे कसा चालणार ? लक्ष्मणरावांजवळची पुंजी आता संपुष्टात आली होती. तेव्हा मुंबई बँकिंग कॉर्पोरेशनच्या बेळगावच्या शाखेकडे त्यांनी दहा हजार रुपये कर्ज मागितले; पण जामीन मिळेना, तेव्हा ती खटपट फुकट गेली.

लक्ष्मणराव अशा फिकिरीत असता एक चमत्कार घडला. एक दिवस त्यांच्या कारखान्यात एक गृहस्थ अचानकपणे आले व त्यांना म्हणाले, "या रस्त्यावरून जाताना तुमचे काम चालू असलेले मी रोज पाहतो. हा तुमचा उद्योग पाहून तुमच्याबद्दल माझं फार चांगलं मत झालं आहे. मला असंही कळलं, की सध्या तुम्हांला पैशांची थोडी नड आहे. तेव्हा तुम्हांला देण्यासाठी हे दोन हजार रुपये मी आणले आहेत. ही रक्कम घ्या व तुमच्या सवडीनं परत करा."

या गृहस्थाचे नाव श्री. रामभाऊ गिंडे. शहापुरातील एक घरंदाज व प्रतिष्ठित व्यक्ती. त्यांनी केलेली ही मदत अर्थात लक्ष्मणरावांस फार उपयोगी पडली. एवढेच नव्हे, तर पुढेही लक्ष्मणरावांस जेव्हा पैशाची गरज भासे त्या वेळी एक चिठ्ठी पाठवण्याचा अवकाश, रामभाऊ ती ताबडतोब दूर करत. या जगात काही व्यक्ती दुसऱ्याच्या मार्गात विघ्न आणण्यातच आयुष्याचे सार्थक मानतात, तर काही सज्जन इतरांस शक्य ते साहाय्य करावयास तयार असतात. या दुसऱ्या प्रकारची माणसे अर्थातच फार दुर्मिळ असतात. लक्ष्मणरावांना स्वयंस्फूर्तीने साह्य करणाऱ्या रामभाऊ गिंड्यांची गणना याच कोटीत केली पाहिजे.

पैशाची नड तात्पुरती भागली, पण मुख्य काळजी दूर व्हायची होतीच. नांगरांना मागणी येण्याचे अजूनही चिन्ह दिसेना. एखाद्या अडगळीप्रमाणे ते सहा नांगर धूळ खात तसेच पडून राहिले होते! बहुतेकजणांना लक्ष्मणरावांची ही सारी खटपट वाया जाणार असे वाटू लागले. त्यांनी हा नाद सोडून द्यावा

असाही कित्येकजण त्यांना पोक्त सल्ला देऊ लागले; पण लक्ष्मणरावांचे मत ठाम. आज ना उद्या या नांगरांना कोणीतरी गिऱ्हाईक मिळेल व एकदा त्याचे फायदे शेतकऱ्यांना प्रत्यक्ष कळले म्हणजे पुढे आपोआप त्यांची मागणी वाढत जाणार, ही त्यांची खात्री.

आणि त्याप्रमाणे एक दिवस खरेच घडले. मिरजेकडील जोशी या नावाचे एक सुशिक्षित जमीनदार या नांगरांची चौकशी करण्यास बेळगावला आले व त्यांना या नांगरांचे महत्त्व पटून सहाच्या सहा नांगर त्यांनी विकत घेतले! त्यांच्यापाठोपाठ पलूस येथील पांडू पाटील यांनी बेळगावला येऊन पस्तीस नांगरांची ऑर्डर दिली. लक्ष्मणरावांची कल्पना यशस्वी ठरली!

तथापि, आपण जो माल तयार करायचा तो तांत्रिकदृष्ट्या निर्दोष व टिकाऊ असला पाहिजे, हा लक्ष्मणरावांचा सुरुवातीपासूनचा कटाक्ष. तेवढ्यासाठी नांगरासारखा साधा दिसणारा माल करतानादेखील त्याच्या रचनेचे शास्त्र त्यांनी काळजीपूर्वक हाताळले. नांगराच्या फाळाचा कोन, पाठीचा बाक, हाळीसाची लांबी यांच्यांत एक तसूभर अंतर पडले, तरी नांगर सुती चालणे अशक्य; म्हणून नांगर तपासण्यासाठी लक्ष्मणरावांनी एक यंत्र तयार केले. यंत्रावर प्रत्येक नांगराची काटेकोर परीक्षा झाल्यावरच तो बाहेर पाठवला जाई.

जोशी यांनी नेलेल्या नांगरांबद्दलचा त्यांचा अनुभवही लक्ष्मणरावांनी मागवला. त्यावरून आपल्याकडील काळ्या जमिनीत वापरण्यासाठी नांगर अधिक वजनदार हवा असे आढळून आले. त्याप्रमाणे नांगराचे काही भाग अधिक जड करून हाळीसपट्ट्यांची लांबी वाढवून त्यात जरूर ती सुधारणा करण्यात आली.

हे नांगर शेतकी खात्याकडे पाठवून त्यांचा अभिप्राय मागवण्यात आला. त्या खात्याचे वरिष्ठ अधिकारी सर्व युरोपियन. त्यांचा ओढा साहजिकपणे विलायती नांगरांकडे. त्याच नांगरांची ते शिफारस करत. ते नांगर वापरणाऱ्या शेतकऱ्याला मुंडासे बांधून त्याचा गौरव करत. खात्याने शेरा दिला, की तुमच्या नांगराची रचना ठीक असली, तरी तुमचे फाळ लवकर झिजतात. सबब शेतकऱ्यांस तुमच्या नांगराची शिफारस करता येत नाही.

हा शेरा कळल्यावर लक्ष्मणराव थोडेच स्वस्थ बसणार! या दोषाची शहानिशा करण्याचे त्यांनी ठरवले. त्यांनी तेवढ्यासाठी निरनिराळ्या विलायती कंपन्यांचे

फाळ मागवले. ते सर्व ओतीव बिडाचेच होते. मात्र ते हातोड्यांनी फोडल्यावर प्रत्यक्ष जमिनीशी घर्षण होणारा त्यांचा पृष्ठभाग अतिशय कठीण केलेला आहे, असे त्यांना आढळून आले. त्यावर कानस चालणेदेखील कठीण. ते फाळ लवकर झिजत नव्हते, याचे हेच कारण.

बिडाच्या भागाचे कवच असे कठीण करण्याची कृती काय असावी याच्या शोधाला ते लागले व सरतेशेवटी ती युक्ती त्यांना सापडली. कसलीही अडचण आली, की परदेशी यंत्रविषयक मासिकांची उलथापालथ करून त्यांतून हवी ती माहिती काढायची हे त्यांचे ठरावीक तंत्र. हेच तंत्र या वेळी त्यांना उपयोगी पडले. विलायती फाळ 'चिल' करण्यास कोणती पद्धत वापरतात याचा त्यांना पत्ता लागला. ही पद्धत सोपी होती व ती अमलात आणताच किर्लोस्कर फाळही तंतोतंत विलायती फाळासारखे होऊ लागले. मात्र तेवढ्यावरच त्यांचे समाधान झाले नाही. त्यांनी आपले प्रयोग आणखी पुढे चालू ठेवून आपल्या फाळांत एवढी सुधारणा केली, की ते टिकाऊपणात विलायती फाळांपेक्षाही सरस ठरले.

**प्रश्न :**

अ. खालील प्रश्नांची प्रत्येकी चार-पाच वाक्यांत उत्तरे लिहा.

१. लक्ष्मणरावांनी आपले दुकान का विकले ?

२. नांगराचे मनपसंत भाग तयार करण्यापर्यंत लक्ष्मणरावांना काय काय करावे लागले ?

३. कारखाना चालू ठेवण्यात तात्पुरती सोय कशी झाली ?

**आ.** खालील प्रश्नांची थोडक्यात उत्तरे लिहा.

१. आपला देश मागासलेल्या स्थितीत राहण्याचे कारण कोणते ?

२. सुरुवातीला लोखंडी नांगराबद्दल लोकांच्या कोणत्या अडाणी कल्पना पुढे आल्या ?

३. शेतकी खात्याने सुरुवातीला किर्लोस्करांच्या नांगरांची शिफारस का केली नाही ?

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. 'यशाचा उगम मनात स्फुरलेल्या एखाद्या सूक्ष्म कल्पनेपासून झालेला असतो' हे किर्लोस्करांच्या बाबतीत कसे लागू पडले ते सांगा.

२. खनपटीला बसणे, भवति न भवति करणे, शहानिशा करणे, नावे ठेवणे या शब्दसमूहांचा वाक्यांत उपयोग करा.

३. पाठात आलेली म्हण सांगा व ती कोणत्या संदर्भात आलेली आहे, ते लिहा.

४. लोखंडी नांगराचे आत्मवृत्त लिहा.

**व्याकरण :**

पुढील शब्द पाहा :

१. खाणीत = खाण + ईत. खाण याचे 'खाणी' हे सामान्यरूप.

२. वाड्याला = वाडा + ला. वाडा याचे 'वाड्या' हे सामान्यरूप.

नाम व सर्वनाम यांना विभक्ती प्रत्यय जोडताना त्यांच्या रूपात जो बदल होतो त्यास सामान्यरूप म्हणतात, हे वरील उदाहरणावरून लक्षात येते.

आता पुढील शब्द पाहा :

१. घरात = घरा + त. 'घरा' हे सामान्यरूप घर या शब्दाच्या शेवटी असलेल्या अ चे आ होऊन झाले.

२. कर्तव्यात = कर्तव्य + त. 'कर्तव्य' शब्दातील अंत्य अ चा आ असा दीर्घ स्वर होऊन 'कर्तव्या' हे सामान्यरूप तयार झाले.

सामान्यरूप होताना शब्दाच्या शेवटी असलेल्या ऱ्हस्व अ चा दीर्घ आ होतो, हे वरील उदाहरणावरून लक्षात येते.

खालील उदाहरणे पाहा :

१. खाणे + चा = खाण्याचा 　　 २. जिणे + त = जिण्यात

३. मोरे + ना = मोऱ्यांना 　　 ४. लेणे + त = लेण्यात

वरील खाणे, जिणे, मोरे, लेणे या एकारान्त शब्दांचे सामान्यरूप खाण्या, जिण्या, मोऱ्या, लेण्या असे याकारान्त झाले आहे, म्हणून एकारान्त शब्दांचे सामान्यरूप याकारान्त करावे. खाणेचा, मोरेंना, जिणेत, लेणेत या प्रकारे करू नये.

**अभ्यास :**

पुढील शब्दांना विभक्ती प्रत्यय जोडून बनणारी त्यांची रूपे लिहा.

तळे, आकाश, लढणे, फूल, भीती, संगीत, भिडे, शिकणे, मत, लढा, माळा, कमल, साने, घडा, बेणे, कैलास, चांदणे, प्रकाश, जागणे, फडके.



# १६. राजर्षी शाहू महाराज

**कृ. ल. मोरे:** मातंग समाजातील कळकळीचे कार्यकर्ते. 'प्रकाश-क्रांती' या नियत-कालिकाचे संपादक. सध्या सर्वोच्च न्यायालयात ते वकिली करतात.

प्रस्तुत लेख 'छत्रपती शाहू महाराज गौरवग्रंथ' यातून घेतला आहे.

छत्रपती शाहू महाराजांनी एका मातंग समाजातील मुलाच्या शिक्षणाची कशी सोय केली याची हकीकत येथे सांगितली आहे. यातून छत्रपती शाहू महाराजांचा मानवतावादी दृष्टिकोन स्पष्ट होतो.

१९२० मधील एप्रिल महिन्यातला एक दिवस. सायंकाळी पाच-सहा वाजण्याच्या सुमारास छत्रपती शाहू महाराज रजपूतवाडी कँपात व्यवस्था पाहत हिंडत होते. पहिलवानांचा विभाग पाहून झाल्यावर ते चित्त्यांच्या विभागाकडे वळले. त्यानंतर घोडे, कुत्री, रेडे, बैल, म्हशी, बहिरी ससाणे असे अनेक विभाग पाहत पाहत ते हत्ती विभागाजवळ आले. हत्तीच्या माहुताला जवळ बोलावून ते काहीतरी सूचना देत होते. या वेळी कँपात मुलामाणसांची बरीच गर्दी झाली होती. अशी गर्दी नेहमीच व्हायची. कारण सगळ्या लहानथोरांना शाहू महाराजांचे दर्शन व्हावे अशी जबर इच्छा असायची. राजा म्हणूनच नव्हे तर महाराज एक आकर्षक व्यक्ती होती म्हणून. महाराज एकदम मागे वळले आणि बंगल्याच्या फाटकाकडे तोंड करून त्यांनी एक-दोन पावले टाकली. त्या वेळी मी त्यांच्यासमोर दहा-पंधरा फुटांवर होतो. शाहू महाराजांची दृष्टी माझ्यावर खिळली. धैर्य करून महाराजांना मी अत्यंत आदराने मुजरा केला. मुजरा करण्यासाठी वाकलेली मान मी सरळ करतो न करतो तोच, ''कोण रे तू?'' अशी गर्जना झाली. ''मी कृष्णा. मातंग समाजाचा. मला साळा सिकायची हाय'', असे मी बोललो व हात जोडून उभा राहिलो. ''उद्या ये रे,'' असे म्हणून महाराज पुढे जाऊ लागले. चपळाईने मी बाजूला सरकलो. महाराज पुढे गेले. मी इकडे तिकडे पाहू लागलो, तर मुलेमाणसे दूर दूर सरकलेली होती. शाहू महाराजांचा दराराही काही औरच होता. विनाकारण बेशिस्तीने अगर



बोलावल्याशिवाय महाराजांच्या आसपास उभे राहणे ही काही साधीसुधी बाब नसे.

महाराजांनी 'उद्या ये रे' असे म्हणून आपली दखल घेतली त्याचे मला नवल वाटले. या विचारचक्रात फिरत असता मी सोनतळी जेलच्या आवारात येऊन पोहोचलो. तेथे माझा भाऊ रामचंद्र पोलीसखात्यात नोकरीला होता. तो त्याच वेळी पहाऱ्याच्या पाळीवर निघाला होता. त्याला थांबवून मी सर्व हकीगत सांगितली. त्यावर तो उद्गारला, "तुझं नशीब थोर हाय."



दुसऱ्या दिवशी स्नान वगैरे करून तयार झालो. माणिक चौकामधील माझ्या शाळेत जाऊन थोडा वेळ बसलो. काही वेळाने कुलकर्णी गुरुजी आले. गुरुजींना मी महाराजांकडे जाणार असल्याचे सांगितले. गुरुजी 'जा' म्हणाले. मी माझी उजळणीची पाटी माझ्या जागेवर ठेवून तडक महाराजांच्या बंगल्याच्या समोरील फाटकाजवळ जाऊन उभा राहिलो. महाराज नित्याप्रमाणे नऊ-दहाच्या सुमारास फाटकाबाहेर सज्ज ठेवलेल्या मोटारगाडीजवळ आले. मी मुजरा केला नि बोललो, "महाराजांची आज्ञा." महाराज काहीच बोलले नाहीत. त्यांनी माझ्याकडे पाहिलेही नाही. काही वेळ गेल्यावर मी "महाराजांची आज्ञा" असे पुन्हा पुटपुटलो. तरीही काहीच दाद अगर दखल घेतल्याचे दिसेना. महाराज बोलण्यात गर्क होते, हे माझ्या लक्षात आले नाही. बराच वेळ झाला, असे वाटून पुन्हा एकदा मी बोललो, "महाराजांची आज्ञा झालीया." महाराज रागाने माझ्याकडे तोंड करून म्हणाले, "बोलणारा झालास रे!" मी घाबरलो व पाठीमागे सरकून उभा राहिलो. भेटीला बोलावलेल्या लोकांशी बोलून होताच महाराजांनी मोटारीच्या फ्रंट सीटवर बसण्यास पाय उचलला. महाराज फ्रंट सीटवर बसले. मग अरबशाह

नावाच्या आपल्या आवडत्या गृहस्थास मोटारीत बसण्यास सांगितले. आणखी एक-दोन प्रतिष्ठित मंडळींनाही त्यांनी बसण्यास सांगितले. एवढे होईपर्यंत जो वेळ निघून जात होता तो मला असह्य वाटत होता. मला वाटत होते, की महाराज मला विसरले. तोच सिंहगर्जनेसारखा आवाज आला, "अरबशाह, त्या पोराला मागे बसव." अरबशाहने मला मोटारीत बसण्यास सांगितले. मी आनंदाने मोटारीत बसलो. ती फोर्ड मोटार होती. महाराज बसलेल्या सीटच्या पाठीमागे व ड्रायव्हरच्या सीटच्या मागे, अशा दोन्ही बाजूंना पाच-पाच माणसे बसतील अशी समांतर बाकडी होती. त्यातल्या एका बाकड्यावर मी बसलो होतो. मोटारीत मध्यावर महाराजांचे एक केसाळ असे विलायती कुत्रे साखळीला बांधले होते. मोटार हलण्यापूर्वी ते कुत्रे बाहेर उडी मारण्याच्या धडपडीत असता त्याला सावरण्यासाठी जी माझी हालचाल झाली, त्यामुळे आकस्मिक माझी नजर मोटारबाहेर जरा दूरवर पसरलेल्या जनसमुदायाकडे गेली. 'मांगाच्या कृष्णाला आज महाराजांनी मोटारीत का घेतले?' म्हणून माझ्याकडे बोट दाखवून जो तो कुजबुजत आहे, असे मला दिसले. विशेष म्हणजे माझा खेळगडी सीताराम मला दिसला. तो तर तोंडात आश्चर्याने बोट घालून उभा होता.

मोटार जशी वेगाने जाऊ लागली तसे ते कुत्रे मागच्या बाजूने सारखे उडी घेण्यात गर्क असायचे. मला त्या कुत्र्याला सावरण्याचे कामच लागले. माझ्या देखत कुत्रे खाली पडले तर भलतेच व्हायचे, म्हणून मला त्याच्याकडे सारखे लक्ष द्यावे लागे. महाराजांची मोटार जी चालू झाली ती कॅंपाच्या पहिल्या फाटकाजवळ उभी राहिली. तेवढ्यात घामाघूम झालेले, पाच-सहा स्वयंपाकी महाराजांना मुजरा करत बाहेर आले. महाराज मोटारीतून उतरले. अरबशाहाही उतरला. अरबशाहाच्या खांद्यावर भार तोलून महाराज त्या स्वयंपाकघरात गेले. त्यांनी तेथील पाहणी केली व ते परत मोटारीत येऊन बसले.

महाराज मोटारीत बसेपर्यंत माझ्या मनात अनेक शंका येत होत्या; कारण त्याच स्वयंपाक्याकडून मी सकाळी, संध्याकाळी नियमित दोन-दोन भाकरी घेऊन जात असे. जो जो शाळेला जाई,त्याला त्याला भाकरी मिळत असे.

महाराजांची मोटार काही वेळात कोल्हापूरकडे भरधाव सुटली. पुढे पंचगंगेचा पूल ओलांडून मोटार पापाच्या तिकटीला येऊन थांबली. महाराजांनी 'पापा'

म्हणून हाक मारली. पापा म्हणजे पापा परदेशी आपल्या दुकानातून गडबडीने बाहेर आला व त्याने महाराजांना मुजरा केला. महाराजांचे व पापाचे बोलणे सुरू झाले. "पापा, काय बातमी आहे ?" पापा म्हणाले, "महाराज, सगळीकडे विशेषतः पुण्या-मुंबईकडे तुमच्यावर टीका सुरू झाली आहे. तुम्ही अस्पृश्यांना व मागासलेल्यांना जवळ करता म्हणून काही लोकांचा जळफळाट सुरू झाला आहे." माझ्याकडे बोट करून महाराज पापांना म्हणाले, "हे बघा, पापा आजच मी मातंग समाजातला पोरगा आणला आहे. मी कुणाच्याही टीकेला भीत नाही किंवा जळफळाटालाही जुमानत नाही." इतके म्हणून पापांना मोटारीत बसवून महाराज थोडा वेळ शहरात फिरले.

... नंतर शाहू महाराजांनी गाडी पुढे नेण्यास सांगितले. मोतीबाग इमारतीच्या आगाशीत महाराज खुर्चीवर बसून कारभारविषयक आणि विशेषतः धान्यटंचाई दूर करण्यासाठी ज्वारी, तांदूळ वगैरेची वाटप व्यवस्था पाहत तेथे आम्ही पोहोचलो. काही वेळाने गुरुकुलचे सुपरिंटेंडेंट श्री. आय. टी. निंबाळकर तेथे आले. महाराजांना त्यांनी लवून मुजरा केला. महाराज निंबाळकरांना म्हणाले, "निंबाळकर, या मुलाला गुरुकुलमध्ये ने. याची चांगली व्यवस्था करून शिक्षण दे." "हुकूम महाराज, जी महाराज," अशा गोड आवाजात व शब्दांत महाराजांची आज्ञा मानून त्यांनी माझी शिक्षणाची सर्व सोय केली.

ज्या गुरुकुल संस्थेत महाराजांनी माझ्या शिक्षणाची सोय केली ती महाराजांच्या अनेक संस्थांत लाडकी संस्था होती. त्या संस्थेवरील सर्व खर्च हुजूर ट्रेझरीतून होत होता.

माणसाच्या जीवनात एखादी अशी घटना घडते, की त्या घटनेमुळे माणसाच्या सबंध आयुष्याला कलाटणी मिळते.

प्रश्न :

खालील प्रश्नांची थोडक्यात उत्तरे लिहा.

१. रजपूतवाडी कँपवर कृष्णाच्या आयुष्याला कलाटणी देणारी कोणती घटना घडली ?

२. कृष्णाचा भाऊ 'तुझं नशीब थोर हाय' असे का म्हणाला ?

३. महाराज आपल्याला विसरले, असे कृष्णाला कशामुळे वाटले ?
४. 'मी कोणाच्याही टीकेला भीत नाही किंवा जळफळाटालाही जुमानत नाही' असे शाहू महाराज केव्हा म्हणाले व का ?
५. छत्रपती शाहू महाराजांच्या कोणत्या गुणविशेषांचे या पाठातून दर्शन घडते ?

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. 'शिक्षणप्रेमी' म्हणून छत्रपती शाहू महाराज यांचे व्यक्तिचित्र थोडक्यात रेखाटा.
२. छत्रपती शाहू महाराज यांच्या आठवणी माहीत करून घ्या आणि त्यांतील एक-दोन आठवणी वर्गात सांगा.
३. छत्रपती शाहू महाराज यांच्या जयंतीनिमित्त करायच्या भाषणाचे टिपण तयार करा.

**व्याकरण :**

खालील शब्द पाहा.

१. शाहिराने = शाहीर + ने = सामान्यरूप शाहिरा
२. बहिणीला = बहीण + ला = सामान्यरूप बहिणी
३. मुलास = मूल + स = सामान्यरूप मुला
४. खुनात = खून + त = सामान्यरूप खुना

वरील उदाहरणांवरून असे लक्षात येते, की मराठी शब्दातील उपान्त्य अक्षर ई किंवा ऊ या दीर्घ स्वरांनी युक्त असेल तर सामान्यरूपात ते ऱ्हस्व होते. संस्कृत भाषेतून आलेले शब्द जसेच्या तसे राहतात.

आता खालील शब्द पाहा.

१. पूजेची २. सूत्रात ३. गीतात ४. नीतीला

**अभ्यास :**

खालील शब्दांना विभक्ती प्रत्यय लावून बनणारी त्यांची रूपे लिहा.

पीठ, विद्यापीठ, जीव, पुत्र, प्रीती, पुणे, दीन, खेळणे, मजूर, विहीर, वीणा, जाणीव, रुची, संगीत, तूर, हुकूम, रीत, पूर्व, प्रावीण्य, विहीण, चुना, महिमा, झूल, ध्रुव, भूत, पत्रिका, कुंभ, भारतीय, कोल्हापूर.





# १७. बहुभाषिक व्हा !

**द. बा. पोतदार** (दत्तो वामन पोतदार : १८९० - १९७९) थोर इतिहास संशोधक, व्यासंगी विद्वान, पट्टीचे वक्ते. 'मराठी गद्याचा इंग्रजी अवतार', 'श्रोते हो', 'शिवचरित्राचे पैलू' ही त्यांची पुस्तके प्रसिद्ध आहेत.

आपली मातृभाषा आपल्याला प्रिय असते, असायलाच पाहिजे; पण त्याचबरोबर आपण आपल्या इतर भारतीय भाषा आणि परकीय भाषा यांचाही अभ्यास करायला पाहिजे. असे केल्याने भारताचे भविष्य उज्ज्वल होईल असा संदेश या लेखातून दिला आहे.

प्रत्येकाला आपली जन्मभाषा प्रिय असते. आधीच ती जन्मभाषा; त्यातून तीत सुंदर सुंदर ग्रंथांचा खजिना काठोकाठ भरलेला; हवे ते ज्ञान मायभाषेतून मनसोक्त लुटण्याइतकी तिची गाढी श्रीमंती, मग काय बोलावयासच नको! तिच्यावर तिच्या लेकरांची झड पडणारच! अगदी सहज गोष्ट आहे ती.

तथापि, आपण आणि आपली मायभाषा एवढ्यावरच काही जग संपत नाही. जरा जगाकडे दूरवर दृष्टी फेकली की सहज ध्यानात येते, की आपल्या देशासारखेच दुसरे अनेक देश या पृथ्वीतलावर डौलाने नांदत आहेत आणि त्या त्या देशात तेथल्या मायभाषाही मोठ्या संपन्न आहेत. जगात अशा वैभवशाली भाषा अनेक आहेत आणि या विभिन्न देशांतील लोकांची आपापसांत सतत ये-जा चालू असते.

ते आपल्या देशातील माल दुसऱ्या देशात रिचवून तेथील बाजारपेठा भरून टाकत असतात आणि दुसऱ्या देशातील माल खरेदी करून आपल्या देशातील उतारपेठा सजवत असतात. असा क्रम अहोरात्र धडाक्याने चालला आहे. आता अशा वेळी जर एकाची भाषा दुसऱ्यास येत नसेल तर हा प्रचंड व्यवहार निभावेल तरी कसा ? खाणाखुणांनी किंवा नेत्रपल्लवी, करपल्लवी करून कोठवर काम उरकेल? उभय पक्षांतले लोक या संधीतच संगतीचा लाभ साधून घेतात आणि निदान कामापुरती का होईना सहजासहजी दुसऱ्याची भाषा उचलतात, दुभाषे तयार होतात आणि व्यवहाराची एक भाषा तयार होते.

पण उद्योगी माणसे एवढ्यावरच थांबत नाहीत. रोजच्या व्यवहारापलीकडे जाऊन, दुसऱ्यांचे देशही पाहून-पारखून घेतात आणि त्या दुसऱ्या देशांची भाषा ते उत्तम प्रकारे जाणू लागतात. शिवाय, जगात सगळेच व्यापारी असतात थोडेच? काही प्रवासाचे हौशी असतात, काही शोधक असतात, काही ज्ञानाचे हव्यासी असतात, कोणी काही कोणी काही. असे नाना हेतूंचे, नाना परीचे लोक असतात आणि अशा लोकांच्या द्वारे माणसांच्या मागोमाग निरनिराळ्या भाषाही या देशातून त्या देशात जातात, राहतात आणि वाढतातही.

आता आपल्याच देशाकडे पाहा ना! इंग्रजी ही भाषा वास्तविक मूळची कोणाची? कुठे साता समुद्रापलीकडचा इंग्लंड देश. देश कसला? एक इवलेसे बेट! आणि पृथ्वीच्या इतक्या दूरच्या टोकावरील लोकांची ही इंग्रजी भाषा. या भाषेत जे ज्ञान आहे, जो रस आहे, तो टाकणे म्हणजे आपले आपणच नाहक नुकसान करून घेणे आहे. इतकेच नव्हे, भारताबाहेरील जगाशी आमचा संबंध जो इंग्रजी भाषेमुळे जडला, तो संबंध तर यापुढे आम्हांस पूर्वीपेक्षाही वाढवणेच भाग आहे. आता आम्हांला स्वतंत्रपणाच्या बरोबरीने जगाच्या दरबारात वावरायचे आहे. तेव्हा त्या जगाच्या दरबारात वावरताना हे इंग्रजीचे हातचे साधन टाकून कसे चालेल? म्हणून ज्याला त्याला जशी बुद्धी आणि हौस असेल तसे त्याने हरप्रयत्नाने इंग्रजीचे उत्तम ज्ञान मिळवण्याविषयी आळस करू नये.

काय आश्चर्य पाहा! भारत आणि चीन यांच्यात केवळ एक हिमालय पर्वताची भिंत. हे देश पाठीला पाठ लावून हजारो वर्षांपासून उभे आहेत. पण दोन्ही देशांतील लोकांस एकमेकांची भाषा समजत असेल तर शपथ!

चिनी बंधू आणि आम्ही एकमेकांची भाषा न समजल्याने एकमेकांपासून दुरावून बसलो आहोत. चीन आणि भारत यांच्यामध्ये दाट मैत्री वाढवणे अगत्याचे आहे. राजकीय दृष्टीपेक्षा सांस्कृतिक दृष्टीनेच तसे करणे दोघांच्याही लाभाचे ठरणार आहे. चिनी भाषांचे ज्ञान भारतात आणि भारतीय भाषांचे ज्ञान चीनमध्ये वाढीस लावले पाहिजे, म्हणून जमेल त्यांनी चिनी भाषा अवघड वाटली तरी आणि लिपी विचित्र असली तरी शिकली पाहिजे. मोठे व्हायचे आणि मोठे म्हणवून घ्यायचे तर व्यापही मोठाच केला पाहिजे. सुखासुखी थोरपण कधीच लाभत नाही.

.चीनच्या पलीकडे रशिया आणि जपान हेही आहेतच! रुसी भाषेचे जगातले वाढते महत्त्व काय निराळे ठसवायला हवे! इतके लांब कशाला, भारताला चिकटूनच पूर्वेला म्यानमार (ब्रम्हदेश) आणि पश्चिमेला अफगाणिस्तान हे देश आहेत. तेथील भाषाही नकोत का शिकायला? दूर कशाला जा. आपल्या भारतात जरा दृष्टी फेकून पाहा ना! मराठीला खेटून कानडी, गुजराथी, तेलुगु या भाषा बोलणारे प्रदेश आहेत. आपण सारे एकाच भारताची प्रजा! आपण एकमेकांच्या भाषांचा कंटाळा करून कसे चालेल? विरोधाचे तर नावच नको! निदान जवळच्यांनी तरी जवळच्यांची भाषा शिकलीच पाहिजे. प्रेमाने शिकली पाहिजे. रवींद्रनाथ टागोरांसारख्यांची रसाळ वाणी जीतून प्रकट झाली ती बंगाली भाषा तरी कोणाची? आपलीच भारतीय भगिनी नव्हे का?

कोणी बंगाली भाषा शिकली पाहिजे, कोणी आसामी, कोणी मैथिली, कोणी अवधी, कोणी राजस्थानी, कोणी पंजाबी, कोणी सिंधी, कोणी काश्मिरी, कोणी तामीळी, कोणी मल्याळी आणि कोणी ती ब्रज शिकलीच पाहिजे ! आणि त्यात प्रथम वाटते तितके अवघड काही नाही. आपण उगाच बाऊ करतो! एकदा थोडा शिरकाव झाला म्हणजे यातील बहुतेक भाषा एकमेकींना किती जवळच्या आहेत हे आपोआप लक्षात येऊ लागेल!

इतक्या विश्वासाने बोलण्याला आपल्याजवळ भला मोठा आधार आहेना! आपली प्रिय संस्कृत भाषा! वेद, शास्त्रे, पुराणे, काव्ये, नाटके इत्यादींचे संस्कृतातील अमाप पीक काय पाहिजे त्याचा पुरवठा आमच्या वरील भाषांस अनंत हस्तांनी करत आलेले आहे. या अमरवाणीचे अध्ययन प्रत्येकाने केले तर ती मोठ्याच संतोषाची गोष्ट होईल; पण तसे जरी घडले नाही तरी आमच्या महाराष्ट्रीप्रभृती प्राचीन प्राकृत भाषा आणि त्याच परंपरेने उदय पावलेल्या आमच्या आजच्या देशी भाषा संस्कृत भाषेचाच वारसा पुढे चालवत आहेत. असा आमचा भाषाप्रपंच मोठा बहुशाखी, फलभारसंपन्न आहे. तो वारसा टिकवा. एवढे ध्यानात ठेवा, की आता ते सर्व जुने अमौलिक धन घराघरांतून, खेड्यापाड्यांतून मिरवले पाहिजे. आजचा कालपुरुष तुम्हांला हिमालयाच्या गुहेत निवांतपणे बसू देणार नाही! तो तुम्हांला आमच्या प्रजेच्या झोपड्यांतून फिरावयास लावील आणि या कोटी प्रजांना समाजाच्या भाषांतून तुम्हांस त्या प्रजेची सेवा करावयास लावील! निकामी पांडित्य काय कामाचे?

एवढे मात्र खरे, की सारे तुमच्या उत्साहावर, प्रयत्नांवर आणि निष्ठेवर अवलंबून आहे. तुमचे भविष्य तुमच्या हाती आले आहे. या वेळी पहिले मानाचे पान मराठीप्रभृती देशभाषांचे! तुमचा सारा कारभार - सारा ज्ञानव्यवहार, तुमचे सारे कौतुक - मराठीप्रभृती तुमच्या तुमच्या जन्मभाषांतून तुम्ही केला पाहिजे, प्रतिज्ञापूर्वक केला पाहिजे!

विसरू नका, की आपण मराठी-गुजराथी-कन्नडादी भाषाभाषिक एका भारताची प्रजा आहोत; म्हणून आपल्या सार्वभारतीय व्यवहारासाठी भारतीय हिंदी भाषेचा उपयोग तुम्ही केला पाहिजे. एतदर्थ तुम्हांस या भारतीय हिंदीचा अभ्यास केलाच पाहिजे. भारताबाहेरील जगाशी येणारा संबंध आणि जबाबदारी योग्य प्रकारे पार पाडण्यास्तव प्रसंगानुरूप इंग्रजी भाषेचे ज्ञानही मिळवले पाहिजे. जन्मभाषेखेरीज शेजारील प्रादेशिक भाषेचे थोडे तरी ज्ञान तुम्हांस प्राप्त करून घेतलेच पाहिजे. शिवाय चिनी, रुसी, जपानी, ब्रम्ही इत्यादी भाषांचा अल्पस्वल्प परिचय तरी तुम्हांस असला पाहिजे. कंटाळण्याचे, घाबरण्याचे, बिचकण्याचे काही कारण नाही. विसरू नका आणि 'बहुभाषिक व्हा'! असे कराल तर भारताचे भविष्य तुम्ही उज्ज्वल कराल!

**प्रश्न :**

खालील प्रश्नांची प्रत्येकी चार ते पाच वाक्यांत उत्तरे लिहा.

१. 'आपण आणि आपली मायभाषा एवढ्यावरच काही जग संपत नाही' असे लेखकाने का म्हटले आहे?
२. भाषिक देवघेवीचा इतिहास कसा घडत जातो?
३. ज्याने त्याने हरप्रयत्नाने इंग्रजीचे उत्तम ज्ञान मिळवण्याविषयी आळस करू नये, असे लेखकाला का वाटते?
४. इंग्रजीप्रमाणेच इतर कोणत्या परकीय भाषा शिकणे लेखकाच्या मते आवश्यक आहे?
५. मातृभाषेखेरीज अन्य भारतीय भाषा आपण का अभ्यासायला हव्या?
६. संस्कृत व प्राचीन प्राकृत भाषा यांच्या अभ्यासातून आपणांस कोणती गोष्ट साध्य करता येईल?

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. तुम्ही बहुभाषिक होण्याचे ठरवले तर कोणत्या परकीय व कोणत्या भारतीय भाषांचा अभ्यास कराल ते सकारण सांगा.

२. 'बहुभाषिक होण्याचे फायदे' या विषयावर तुम्हांस भाषण करायचे आहे. त्याचे टिपण तयार करा.
३. मराठी भाषेचे वैभव ज्यात वर्णन केलेले आहे अशा कवितांचा, शिक्षकांच्या मदतीने संग्रह करा.
४. 'राज्यकारभार व ज्ञानव्यवहार मातृभाषेतूनच घडायला हवा' या विधानाच्या समर्थनार्थ दयायच्या कारणांची एक यादी तयार करा.

**व्याकरण :**

१. खालील शब्द शुद्ध लिहा.
जेऊन, पुजेसाठी, विशेश, उत्कृष्ठ, विशिष्ठ, विहिर, तीला, पाहीले, वांग्मय, तिर.

२. लेखन-नियमांस अनुसरून पुढील उतारा लिहा.
काय आश्चर्य पहा भारत आणि चिन याच्यात केवळ ऐक हीमालय पर्वताची भींत हे देश पाठिला पाठ लाऊन बसले आहेत. त्याना एकमेकाची भाशा समजत असेल, तर शपात.





# १८. दिवस ऊन-पावसाचे

**अरुण खोरे** (अरुण बबनराव खोरे: जन्म १९५४) प्रथितयश पत्रकार, लेखक. उत्कृष्ट पत्रकारितेचा 'दर्पण पुरस्कार' प्राप्त. 'इंदिरा प्रियदर्शिनी', 'दोन युरोप' ही व 'पोरके दिवस' हे आत्मनिवेदनात्मक पुस्तक प्रसिद्ध.

आईचे छत्र हरवल्यानंतर अनाथाश्रमात वाढलेल्या मुलाने आपले महाविद्यालयीन शिक्षण पूर्ण करण्यासाठी 'पोस्टमन'ची नोकरी स्वीकारली. त्या वेळचे प्रत्ययकारी अनुभव या पाठात कथन केले आहेत.

त्या वेळी माझे महाविद्यालयीन शिक्षण चालू होते. सकाळी कॉलेजात जात होतो. शिक्षण चालू ठेवण्यासाठी मला दुपारची दिवसभरची नोकरी हवी होती; पण ती काही मिळत नव्हती. मिळालीच एखादी नोकरी तर काय काय करायचे याची स्वप्ने मात्र मी त्या वेळी रंगवत असे. माझे एक स्वप्न असे होते-महाविद्यालयाच्या अनेक उपक्रमांतून, स्पर्धांतून मी भाग घेत असे. चांगले नाव मिळत होते. स्नेहसंमेलनात, विविध कार्यक्रमांत भाग घेत होतो. त्या वेळी काही मुले मस्तपैकी ब्लेझरचे कोट अंगावर चढवून मिरवायची. असा एखादा सुंदर कोट अंगावर चढवून मिरवायचे अशी फार फार इच्छा होती.

शेवटी एक कोट मिळाला! तो रोजच मिळू लागला! हा कोट होता पोस्टमनचा. खाकी डगला!

एफ.वाय.बी.ए.त असताना वृत्तपत्रातून एक जाहिरात झळकली, 'पोस्टमन भरणे आहेत'.

खरे तर या जाहिरातीने हरखून जावे असे काही नव्हते; पण म्हटले, कॉलेजची दोन वर्षे बेकारीत गेली. आता या नोकरीसाठी प्रयत्न करून पाहू. जमले तर जमले.

अर्ज केला. त्यानंतर लेखी परीक्षा दिली. तीन महिन्यांनी माझी निवड झाल्याचे पत्र आले. मला आनंद झाला आणि त्या पाठोपाठ पोटात गोळा आला. बापरे! मी ज्या झोपडपट्टीत राहत होतो, त्या भोवतालच्या इमारती मला भयंकर

दिसू लागल्या. शेकडो इमारतींचे चार-चार मजले चढून जायचे आणि तेही पत्रे वाटत. ही कल्पनाच मला भयंकर वाटू लागली आणि दुसरे म्हणजे आपल्याला लगेच रुजू व्हावे लागले तर कॉलेज संपलेच! या विचाराने मी बेचैन झालो. मी ही नोकरी न स्वीकारण्यासाठी अन्य पर्याय शोधले, पण व्यर्थ!

शेवटी रुजू झालो. खाकी कपडे चढवलेले अनेक पोस्टमन पोस्टातल्या एका हॉलमध्ये दोन्ही बाजूंनी समोरच्या पत्रांच्या गठ्ठ्यांचे सॉर्टिंग करत बसलेले. मी खिन्न मनाने एका पोस्टमनशेजारी जाऊन सॉर्टिंग पाहत उभा राहिलो. पोस्टमन मित्रांचे हात यंत्रवत चालत होते. सुमारे दोन तासांनी सॉर्टिंग संपले. पत्रांचे गठ्ठे घेऊन सगळे दूत बाहेर निघाले. मी ज्या पोस्टमनसह जाणार होतो, तोही उठला आणि आमची भ्रमंती सुरू झाली.

अडीच एक तास पत्रवाटपाचे काम चालले होते. सुदैवाची गोष्ट एवढीच होती, की या पोस्टमनला जो बटवड्याचा भाग होता, त्यात उंच इमारती फारशा नव्हत्या. मला कामाच्या दृष्टीने बरे वाटले.

कॉलेज साडेसातचं आणि पोस्टात जावं लागे साडेसहालाच! दुसऱ्या दिवशी त्या पोस्टमनला मी सांगितले, की मी कॉलेजात जाणारा विद्यार्थी आहे, तर मला लवकर सोडत जा. तोही भला माणूस होता. आम्ही बटवड्याला बाहेर निघालो, की मला तो पंधरा-वीस मिनिटांनी सोडत असे. मी अदम्य उत्साहाने कॉलेजला पळत सुटे. अशा वेळी कॉलजचे दिवस काही वेगळेच वाटू लागत. मन मोहरून जायचे. मनाला तजेला मिळायचा. हे जग आपल्यापासून अलग होऊ नये, आपण इथून दूर जाऊ नये असे वाटत राहायचे.

प्रशिक्षणाचे दहा दिवस संपले. लवकरच परीक्षा सुरू झाल्या. कॉलेजचे शेवटचे वर्ष सुरू झाले. पोस्टमनच्या नोकरीची ऑर्डर या वर्षात येऊच नये, असे वाटत होते; पण बी.ए.ची परीक्षा होण्यापूर्वी मला पोस्टमन म्हणून पोस्टात रुजू होण्याचा आदेश मिळाला. मी गडबडून गेलो.

दोन चित्रे स्पष्ट दिसू लागली. एक तर हाता-तोंडाशी आलेली पदवी परीक्षा अर्ध्यावर सोडावी लागणार आणि जर ही नोकरी सोडली तर बी.ए. नंतर पुन्हा नोकरीच्या शोधात उन्हात फिरावे लागणार! पर्याय एकच होता पोस्टमनची नोकरी स्वीकारणे हाच! आणि तो मी बिनतक्रार स्वीकारला.

थंडीचे दिवस होते! गारवा बराच होता. मी सहा वाजताच पोस्टात पोचलो. अजून बरेच पोस्टमन यायचे होते. मी पोस्टमास्तरांना भेटलो. एक-दोन ओळखीचे पोस्टमन होते. त्यांनाही भेटलो. मला शिकवणाऱ्या पोस्टमनने सॉर्टिंग कशा पद्धतीने करायचे, हे सांगितले. मला सहा नंबरची बीट दिली होती. मला ट्रेनिंग आणि बीटची माहिती देण्यासाठी एक पोस्टमन माझ्याबरोबर आला.

सुरुवात टपाल ठेवण्याच्या बॅगेपासून असते. तीन-चार कप्पे असणारी जाड, खाकी कापडाची बॅग. पत्रे, पाकिटे, आकाराने लहान-मोठी चौकोनी मासिके, अहवाल यांचे टपाल अशी साधारण विभागणी करून ते ठेवावे लागते. तसेच आपण कुठल्या मार्गाने पत्रे वाटणार तो मार्ग निश्चित करून त्याप्रमाणे हे टपाल सॉर्ट करून एकत्र बांधून घ्यावे लागते. टपाल बॅगेत ठेवल्यावर ती सुतळीने सायकलच्या हँडलला व्यवस्थित अशी बांधावी लागते, की त्यातून पत्रे पडणार नाहीत आणि ती सहजी काढूनही घेता आली पाहिजेत.

माझे पहिले तीन दिवस बरे गेले; पण त्या प्रचंड बीटची धास्ती माझ्या मनाने घेतली. चौथ्या दिवसापासून स्वतंत्रपणे बटवडा करायचा होता. माझ्या दृष्टीने तो चौथा दिवस ऐतिहासिक ठरला. पोस्टातून बाहेर पडायलाच मला जवळ जवळ साडेनऊ वाजून गेले होते.



पत्रे टाकत मी पुढे जात होतो. चुकून राहिलेली परत आणून टाकत होतो. कुत्र्यांना भीत भीत त्यांच्या मालकांना जोरात हाक मारून देत होतो. वेळ वाढत चालला होता. बारा-एकच्या सुमारास एका साध्या हॉटेलात थोडा नाश्ता केला. माझ्या एक लक्षात आले, की आजच्या दिवसात ही बॅग काही रिकामी होणार नाही. दिवेलागण झाली तरी माझे काम चालू होते. साडेसात वाजता उरलेली पत्रे बॅगेत ठेवून मी पोस्टाकडे निघालो. त्या दिवशी सुमारे दोनशे पत्रे उरली होती. पोस्टमास्तरांनी माझ्याकडून खुलासा जबाब लिहून घेतला. बहुधा आता आपली नोकरी सुटणार असे मला वाटू लागले; पण नोकरी राहावी, यापुढे आपण ती चांगली करू असे मन म्हणत होते.

दुसऱ्या दिवशी मला कालच्यापेक्षा अधिक उशीर झाला. पोस्टमास्तरांनी जनसंपर्क अधिकाऱ्यांना माझा रिपोर्ट दिला. ते माझ्यावर भलतेच उखडले. पत्रांचे वेळेत वाटप करण्याच्या सूचना दिल्या. त्यानंतर मात्र माझे काम साधारण वेळेत संपू लागले; पण पंधरा दिवसांतच माझी बदली दुसऱ्या पोस्टात झाली.

कामाच्या वाटपाचा परिसर मोठा नव्हता, पण काम खूप होते. काही कारखान्यांतून ५०-६० रजिस्टर्ड पत्रे, वीस-पंचवीस मनीऑर्डर्स असे काम असे. कामगारांना बोलवा, इंटिमेशन ठेवा, सह्या घ्या, पोचपावत्या घ्या असे कागदी घोडे सारखे नाचवत काम चालू असायचे. कामगार नसले, शिफ्ट्स वेगळ्या असल्या की हे काम दुसऱ्या दिवशी पुन्हा तितकेच वाढे.

आता माझ्या बी.ए.च्या परीक्षेला फार थोडे दिवस उरले होते. मी रजेचा अर्ज टाकला आणि तो मंजूर झाल्याचे समजले. मी अभ्यासात मग्न झालो. परीक्षा संपल्यानंतर पुन्हा पोस्टात रुजू झालो. या वेळी ज्या परिसरात कॉलेजची चार वर्षे गेली, त्या परिसरात पोस्टमन म्हणून मला काम करावे लागणार होते. आनंद एकाच गोष्टीचा होता, की कॉलेज ज्या भागात होते त्या भागाची बीट मिळाली नाही याचा. त्यामुळे काळजी बरीच कमी झाली.

हा सगळा भाग म्हणजे चकचकीत, शिष्टाचारी, पांढरपेशा समाजाचा. सुस्थापित, सुखासीन असे जग. त्यांची राहणी, त्यांचा थाट यांना काही वेगळीच खुमारी असे. आपण जिथपर्यंत पोहोचू शकणार नाही, तिथपर्यंत केवळ पत्रे

टाकण्याच्या निमित्ताने मी जात होतो. काही बंगल्यांतल्या कुत्र्यांचे आवाज एवढे भयानक असत, की रखरखत्या उन्हात अंगावर सरसरून काटा येई.

सोसायट्यांची नावेदेखील वैभवशाली; समृद्धीशी नाते सांगणारी. त्यात राहणारे लोकही तितकेच संपन्न. आतापर्यंत बघितलेल्या जगापेक्षा हे सर्वस्वी वेगळे जग होते. इथे माणसे फार कमी भेटायची. माणसांपेक्षा त्यांच्या वास्तू, बंगले, सोसायट्याच अधिक भेटायच्या.

पोस्टमनच्या कामाची सत्त्वपरीक्षा असते ती पावसाळ्यात. कसाही पाऊस असो. पत्रवाटप झालेच पाहिजे! 'अहर्निश सेवामहे' हे ब्रीदवाक्य पोस्टखात्याचे. या ब्रीदवाक्याची सर्वांत जास्त किंमत मोजतो तो पोस्टमनच! रेनकोट घ्या, छत्री घ्या, भिजावे लागणारच! पत्रे कितीही सुरक्षित न्यायचा प्रयत्न केला, तरीही ती थोडीफार भिजतात, पण लोक तक्रारी थांबवत नाहीत.

लाळेगुरुजी नावाचे एक ज्येष्ठ पोस्टमन मित्र म्हणत—"अहो खोरे, पोस्टमनला शंभर मालक! ओव्हरसिअर बोलणार, पोस्टमास्तर बोलणार आणि पब्लिकही बोलणार! आपण सगळ्यांशी गोड बोलून काम चालवायचं!"

पावसाळा संपताच मी बी.ए.च्या उरलेल्या दोन विषयांची तयारी सुरू केली. ऑक्टोबरमध्ये परीक्षा दिली. त्यानंतर बी.ए. ऑनर्स मिळाल्याचे सांगणारी मार्कलिस्टही मला मिळाली.

याच काळात सर्वांचा थरकाप उडवून देईल असे तीन खून एकाच वेळी एकाच घरी पुण्यात झाले. तब्बल चार महिन्यांनी पोलिसांनी आरोपींना पकडले. मी त्याच दिवशी रात्री बसून 'भयासुराच्या छायेतील ते भीषण दिवस' हा लेख लिहिला आणि दुसऱ्या दिवशी सकाळ या दैनिकाकडे पाठवून दिला. पाचव्याच दिवशी तो लेख प्रसिद्ध झाला आणि मला खूप नाव मिळाले. मी आनंदून गेलो. पोस्टात तर कारकून मंडळी माझ्याच लेखाविषयी चर्चा करत होती. जिथे मी पत्रे टाकत होतो, त्या भागातल्या लोकांची मने गलबलून गेली होती. आज जो तो माझे नाव विचारत होता. चहा घेण्याचा आग्रह करत होता.

एका पोस्टमनचे एका लेखकात संक्रमण होत होते. त्याचा अनुभव मी घेत होतो.

लेख प्रसिद्ध झाल्यापासून मला सारखे वाटायचे, की सकाळमध्येच आपल्याला संपादकीय विभागात काम करण्याची संधी मिळाली तर किती बरे होईल; पण त्यासाठी वृत्तपत्रविद्येची पदवी आली, त्यासाठी ही नोकरी सोडणे आले. वाटले सोडावी ही पोस्टमनची नोकरी! पण पुढे काय? दोन्ही वेळच्या जेवणाचे वांधे होतील; पण त्या लेखाने मनाला एक बळ दिले होते. आपल्यात काही न संपणारे असल्याची जाणीव करून दिली होती.

शेवटी मी पोस्टमनच्या नोकरीचा राजीनामा दिला. अनेकांना आश्चर्याचा धक्का बसला. मी थोडा निर्धास्त होतो; कारण एक-दोन ठिकाणांहून कामाची आश्वासने मिळाली होती. त्याच आधारावर वृत्तपत्र विद्याप्रशिक्षणासाठी प्रवेश अर्ज भरला. मुलाखत झाली आणि मला प्रवेश मिळाल्याचे जाहीर झाले. मी बाजी जिंकली होती.

पत्रकार होण्याच्या स्वप्नाने मला आजवर न पाहिलेल्या एका वेगळ्याच जगात आणून सोडले होते. आपण जगाच्या नकाशात जणू एका मध्यवर्ती केंद्रावर उभे आहोत याची जाणीव मला त्या वेळी झाली.

**प्रश्न :**

खालील प्रश्नांची थोडक्यात उत्तरे लिहा.

१. लेखक महाविद्यालयीन शिक्षण घेत असताना कोणती स्वप्ने रंगवत असे?

२. पोस्टमन पदासाठी निवड झाल्याचे पत्र आल्यावर लेखकाच्या पोटात गोळा का उठला?

३. पोस्टमनच्या ट्रेनिंगमध्ये कोणकोणत्या गोष्टी येतात?

४. पहिल्या दिवशी लेखकाला आता आपली नोकरी जाणार असे का वाटले?

५. पोस्टमनच्या कामाची सत्त्वपरीक्षा पावसाळ्यात असते, असे का म्हटले आहे?

६. पोस्टमनचे एका लेखकात संक्रमण होत असल्याचा अनुभव लेखकाने कशाप्रकारे घेतला?

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. नाव मिळणे, हरखून जाणे, पोटात गोळा येणे या शब्दसमूहांचा वाक्यांत उपयोग करा.

२. पोस्टमनची मुलाखत घ्या व ती लिहून ठेवा.

३. जवळच्या पोस्टात जाऊन तेथील कामकाजाची पाहणी करा.





# १९. विचारधन

## १. मानवी संस्कृती

विद्या, धन आणि शक्ती यांची आवश्यकता मनुष्याला आहे व त्याची वृद्धी करणे हे प्रत्येक मनुष्यमात्राचे कर्तव्य आहे; पण या विद्येचा, धनाचा आणि शक्तीचा उपयोग कोणता मनुष्य कशाप्रकारे करतो, हे पाहूनच त्या मनुष्याची संस्कृती श्रेष्ठ आहे किंवा कनिष्ठ आहे, याचा निर्णय दयावा लागतो. केवळ विद्येची, धनाची व शक्तीची वृद्धी केल्याने मानवसंस्कृतीची प्रगती होऊ शकत नाही, तर या विद्येचा, धनाचा व शक्तीचा उपयोग कसा व कोणत्या कामी होत आहे, हे पाहूनच एखादया समाजाची संस्कृती वाढत आहे किंवा ती विनाश पावत आहे, याचा निर्णय करावा लागतो. एखादा मनुष्य विद्वान असेल, सधन असेल व सशक्तही असेल; पण तो जर आपल्या विद्वत्तेचा उपयोग सत्यसंशोधनासाठी न करता केवळ विवादासाठी करत असेल, आपल्या धनाचा उपयोग दानासाठी न करता केवळ उन्मत्त होण्यासाठी करत असेल आणि आपल्या शक्तीचा उपयोग रक्षणासाठी न करता परपीडेसाठी करत असेल, तर अशा मनुष्यास तो कितीही विद्वान असला, धनवान असला वा बलवान असला तरी साधूच्या कोटीत न घालता खलाच्या कोटीत घालावे लागेल. हाच न्याय मानव समाजासही लागू आहे.

— आचार्य शं. द. जावडेकर

## २. ग्रंथवाचन

'ग्रंथ हेच माझे गुरू' असे लोकमान्य टिळकांनी एकदा म्हटले होते. डॉ. केतकरांसारखा विद्वान तर आपला सवडीचा प्रत्येक क्षण वाचनात घालवत असे. बस किंवा ट्राम येईपर्यंतचा वेळ किंवा उपाहारगृहात जेवायला गेल्यावर, ऑर्डर दिल्यानंतर जेवण येईपर्यंतचा काळ कुठल्या ना कुठल्या पुस्तकाचे वाचन करण्यात घालवत. प्रा. शांताराम अनंत देसाई यांच्यासारखे आंतरराष्ट्रीय ख्यातीचे तत्त्वज्ञानी तर मृत्युशय्येवर पडले असता हातात पुस्तक उचलण्याची ताकद उरली नसल्यामुळे ग्रंथाचे एकेक पान फाडून ते वाचत. अ. का. प्रियोळकरांसारखा ग्रंथवेडा विद्वान ग्रंथांना ज्ञानाचे कुंभ असे म्हणत असे. ते एकदा म्हणाले होते : 'आपल्या अंगातील किंवा हवेतील उष्णतामान पाहण्यासाठी जसे थर्मामीटर हे उष्णतामापक यंत्र असते,तसे एखाद्या राष्ट्राचे शहाणपण पाहावयाचे असल्यास त्या राष्ट्रातील ग्रंथसंग्रह हेच खरे ज्ञानमापक यंत्र होय.' सव्वाशे वर्षांपूर्वी लोकहितवादींनी लिहिले : 'हरएक राष्ट्राची ज्ञानाची गणती त्या राष्ट्रातील ग्रंथांच्या सामग्रीवरून करता येते. जसे इंग्रजी भाषेत ग्रंथ आहेत, त्याप्रमाणे इंग्रजांचे शहाणपण आहे. फारसी भाषेत ग्रंथ आहेत त्याप्रमाणे इराणी लोकांचे शहाणपण आहे व त्याचप्रमाणे मराठी भाषेत जितके ग्रंथ आहेत, तितकेच मराठी लोक शहाणे आहेत. तेव्हा ग्रंथसमुदाय वाढवणे हे लोकांचे शहाणपण वाढवणे असे आहे.

**— बाळ सामंत**



## ३. शिक्षणसंस्था आणि विद्यार्थी

सध्या आपल्या समाजातील भिन्न भिन्न संस्थांत जी कर्तृत्वशून्यता दिसून येते ती त्या त्या संस्थांपुरती किंवा तेथल्या अधिकाऱ्यांपुरतीच आहे, अशा भ्रमात आपण राहणे धोक्याचे आहे. या संस्था म्हणजे सर्व समाजापुढे ठेवलेले आरसे आहेत. त्यांत आपलेच प्रतिबिंब आहे, हे सर्व समाजाने व विशेषत: सुशिक्षित बुद्धिजीवी मध्यमवर्गाने ध्यानात घेतले पाहिजे. या वर्गाचे आम्ही लोक नावाला फक्त सुशिक्षित आहोत. मनाने, बुद्धीने म्हणूनच कर्तृत्वाने आम्ही जुन्या, भोळसट, भाबड्या व भोंगळ युगातच असतो. शाळा-कॉलेजात आम्हांला भूमिती, व्याकरण, विज्ञान इत्यादी अर्वाचीन विषय शिकवतात; पण त्यांपैकी एकाचेही संस्कार आमच्या मनावर खोलवर झालेले नसतात. आमच्या शाळा-कॉलेजातील विद्यार्थी हे खेड्यातील मारुतीसारखे स्वयंभू, गोलसर व निराकार आहेत. नव्या युगाची छिन्नी त्यांच्यावर चाललेली नाही. नव्या युगाचे संस्कार होऊन त्यांना आकार आलेला नाही. नव्या शेंदराचे लेपाटे त्यांच्यावर बसत नाही, असे नाही, बसतात; पण आतले पहिले लेपाटे तसेच असतात आणि त्यामुळे त्यांच्या बुद्धीवर एक जाड कवच येऊन बसलेले असते.

— पु. ग. सहस्त्रबुद्धे





# अनुक्रमणिका

## पद्य-विभाग



# १. मराठीची थोरवी

संत ज्ञानेश्वर (१२७५-१२९६) मराठीतील श्रेष्ठ संतकवी. 'भावार्थ दीपिका' (ज्ञानेश्वरी), 'अनुभवामृत' (अमृतानुभव), 'चांगदेव पासष्टी' ही त्यांची ग्रंथसंपदा. त्यांनी बरेच स्फुट अभंगही लिहिले आहेत.

मराठीची थोरवी गाणाऱ्या खालील ओव्या ज्ञानेश्वरीच्या सहाव्या अध्यायातून घेतल्या आहेत.

माझा मराठाचि बोलु कौतुके ।
परि अमृतातेही पैजा जिंके ।
ऐसी अक्षरे रसिके मेळवीन ॥१॥

जिये कोवळिकेचेनि पाडे ।
दिसती नादींचे रंग थोडे ।
वेधे परिमळाचे बीक मोडे । जयाचेनी ॥२॥

ऐका रसाळपणाचिया लोभा ।
की श्रवणींचि होति जिभा ।
बोले इंद्रिया लागे कळंभा । एकमेकां ॥३॥

सहजे शब्दु तरी विषो श्रवणाचा ।
परि रसना म्हणे रसु हा आमुचा ।
घ्राणासि भावो जाय परिमळाचा । हा तोचि होईल ॥४॥

नवल बोलतीये रेखेची वाहणी ।
देखता डोळ्यांही पुरो लागे धणी ।
ते म्हणती उघडली खाणी । रूपाची हे ॥५॥



जेथ संपूर्ण पद उभारे।
तेथ मनचि धांवे बाहिरे।
बोलु भुजाही आविष्करे। आलिंगावया ॥६॥



ऐशीं इंद्रिये आपुलालिया भावीं।
झोंबती परि तो सरिसेपणेचि बुझावी।
जैसा एकला जग चेववी। सहस्रकरु ॥७॥

तैसे शब्दाचे व्यापकपण।
देखिजे असाधारण।
पाहातया भावज्ञां फावती गुण। चिंतामणीचे ॥८॥

**प्रश्न :**

खालील प्रश्नांची थोडक्यात उत्तरे लिहा.

१. संत ज्ञानेश्वरांनी कोणती प्रतिज्ञा केलेली आहे ?
२. मराठी शब्दांमुळे कान, नाक, डोळे काय म्हणू लागतील ?
३. सूर्याचे उदाहरण देऊन संत ज्ञानेश्वरांनी मराठी भाषेचे कोणते वैशिष्ट्य सांगितले आहे ?
४. मराठी शब्दांतून चिंतामणीचा प्रत्यय येईल, असे संत ज्ञानेश्वरांनी का म्हटले आहे ?

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. खालील ओवीचा अर्थ स्पष्ट करा.
ऐका रसाळपणाचिया लोभा। कीं श्रवणींचि होति जिभा।
बोले इंद्रिया लागे कळंभा। एकमेकां ॥
२. खालील शब्दांना प्रतिशब्द सुचवा.
पाडे, नादींचे, कळंभा, प्राणासि, बाहिरे, आपुलालिया, सरिसेपणेचि बुझावी, देखिजे.
३. 'माझी मायबोली' ही सोपानदेव चौधरींची कविता मिळवा व चाल लावून ती पाठ करा.
४. वाचा –
नगरेंचि रचावीं। जळाशयें निर्मावीं।
महावनें लावावीं। नानाविधें ॥ ज्ञाने. १४/२३३



# २. बीज अंकुरे अंकुरे

**मधुकर आरकडे** (मधुकर पांडुरंग आरकडे : जन्म १९५२) नव्या पिढीतील कवी. 'बीज अंकुरे अंकुरे' हा कवितासंग्रह प्रकाशित. याच संग्रहातून प्रस्तुत कविता घेतली आहे.

इवलेसे झाडसुद्धा लोकांना सुखदायक कसे ठरू शकते ? याचे भावचित्र या कवितेत रेखाटले आहे.

बीज अंकुरे अंकुरे ओल्या मातीच्या कुशीत
कसे रुजावे बियाणे माळरानी खडकात ॥धृ॥

बीजा हवी निगराणी हवी मायेची पाखर
लख्ख प्रकाश निर्मळ त्यात कष्टाचा पाझर
हवी अंधारल्या राती, चंद्र-किरणांची साथ ॥१॥

अंकुराचे होता रोप होई रोपट्याचे झाड
मुळ्या रोवून रानात उभे राहील हे खोड
निळ्या आभाळाच्या खाली, प्रकाशाचे गीत गात ॥२॥

नाही झाला महावृक्ष जरी नसे कल्पतरू
फुला-फळांचा त्यावरी नाही आला रे बहरू
क्षणभरी विसावेल, वाटसरू सावलीत ॥३॥

**प्रश्न :**

खालील प्रश्नांची उत्तरे थोडक्यात लिहा.

१. बीजाचे अंकुरण होण्यासाठी कोणकोणत्या गोष्टींची आवश्यकता असते ?

२. झाडांची पूर्ण वाढ होईपर्यंत बीजाला कोणकोणत्या अवस्थांतून जावे लागते ?

३. सर्वच वृक्ष महावृक्ष वा कल्पतरू होत नसले तरी कवी त्यांच्यापासून कोणती अपेक्षा व्यक्त करतो?

४. 'बीज अंकुरणे' आणि 'विस्तारणे' हे मूल जन्मणे आणि शिकून मोठे होणे यासारखे आहे, हे या कवितेच्या आधारे स्पष्ट करा.

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. कवितेतील मध्यवर्ती कल्पनेच्या आधारे एक परिच्छेद लिहा.

२. खालील शब्दांचा वाक्यांत उपयोग करा.
निगराणी, मायेची पाखर, कल्पतरू, वाटसरू.

३. 'शुद्ध बीजापोटी, फळे रसाळ गोमटी' या कल्पनेचा विस्तार दहा ते पंधरा वाक्यांत करा.

४. लाकूडतोड्या आणि झाड यांच्यात संवाद होतो, असे समजून तो सुमारे २० वाक्यांत लिहा.

५. वाचा – तरूवर कराल माया,
तर मिळेल थंडगार छाया ।





# ३. जय जवान, जय किसान

**ग. दि. माडगूळकर** (गजानन दिगंबर माडगूळकर: १९१९-१९७७) मराठी, हिंदी चित्रपटसृष्टीतील प्रसिद्ध पटकथाकार, गीतकार. 'चैत्रबन', 'जोगिया', 'गीतरामायण', 'काव्यकथा' इत्यादी कवितासंग्रह. 'आकाशाची फळे' ही गाजलेली कादंबरी. भारत सरकारने 'पद्मश्री' हा किताब देऊन त्यांचा गौरव केला.

लालबहादूर शास्त्री हे पंतप्रधान असताना जवान व किसान यांचे कार्य सारख्याच महत्त्वाचे आहे अशी घोषणा त्यांनी केली. त्या घोषणेनुसार या गीतात जवान व किसान यांचा जयजयकार करून त्यांचे गुणगान गाइले आहे.

एक सूर, एक ताल, एक गाऊ विजयगान।
जय जवान, जय किसान ॥

अखिल देश पाठिशी, 'जवान' व्हा रणी चला
किसान होऊनी कसा, भूमि सस्य श्यामला
यौवनास योग्य रे, शौर्य आणि स्वाभिमान
जय जवान ॥१॥

शत्रु-मित्र जाणुनी, सावधान सर्वदा
आपल्या श्रमे करू, प्रसन्न देवि अन्नदा
उभ्या जगात आपुली, सदैव उंच ताठ मान।
जय जवान ॥२॥

अजिंक्य सैन्य आमचे, गाजवी पराक्रमा
भूमिदास दाखवी, निर्मितीत विक्रमा
स्वतंत्र हिंद देश हा, स्वतंत्र सिंधु आसमान
जय जवान ॥३॥

**प्रश्न :**

खालील प्रश्नांची थोडक्यात उत्तरे द्या.

१. या कवितेत जवानाला कवी कोणता दिलासा देत आहे ?

२. कवितेमध्ये किसानाला कोणते आवाहन केलेले आहे ?

३. जगात आपली मान ताठ केव्हा राहील ?

४. सैन्य व शेतकरी यांच्याविषयी कवी काय म्हणत आहे ?

५. कवितेला दिलेले शीर्षक योग्य का वाटते ?

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. खालील शब्दसमूह वाक्यांत योजा.
सावधान असणे, प्रसन्न करणे, मान ताठ असणे, पराक्रम गाजवणे.

२. विरुद्ध अर्थाचे शब्द लिहा.
स्वतंत्र, विजय, श्यामल, यौवन, सावध, प्रसन्न, उंच.

३. 'जय जवान, जय किसान' ही लालबहादूर शास्त्रींची घोषणा होती. अशा तऱ्हेच्या इतर घोषणा मिळवून त्यांचा संग्रह करा.

४. 'जय जवान, जय किसान' या विषयावर वक्तृत्व स्पर्धेसाठी भाषण तयार करा.

५. वाचा – समृद्ध शेती राष्ट्राचे वैभव आहे.





# ४. माझ्या मायदेशी

**नारायण सुर्वे** (नारायण गंगाराम सुर्वे: जन्म १९२६) कामगार आणि दलित यांची सुखदु:खे चित्रित करणारे नामवंत कवी. 'ऐसा गा मी ब्रम्ह', 'माझे विद्यापीठ', 'जाहीरनामा' आणि 'सनद' हे त्यांचे काव्यसंग्रह.

ही कविता 'ऐसा गा मी ब्रम्ह' या काव्यसंग्रहातून घेतली आहे. मातृभूमीच्या आत्यंतिक प्रेमाचे भावस्पर्शी वर्णन या कवितेत कवींनी केले आहे.

माझ्या मायदेशी
यावेच सर्वांनी
फुगड्या घालाव्या
फुलां-तारकांनी



मेघानेहि यावे
डुलत-झुलत
विजेनेही यावे
लवत-फुलत



नटली नगरी
रंगाने गडद
पिवळ्या शेतांची
लावून हळद



निळ्याभोर पानीं
चांदण्याचा चारा
सह्याद्रीचा मोर
उभारी पिसारा



हिरव्या पक्ष्यांनो
फुलवा ही बाग
भूपाळीत ओवा
मालकंस राग

अगा सूर्यदेवा
स्पर्श करा येथे
ऐशा भूमीपुढे
नमवावे माथे

**प्रश्न :**

खालील प्रश्नांची प्रत्येकी चार ते पाच वाक्यांत उत्तरे लिहा.

१. आपल्या मायदेशी कोणी, कसे यावे, असे कवीला वाटते ?

२. नगरीचे वर्णन कवीने कोणत्या शब्दांत केले आहे ?

३. पक्ष्यांनी आणि सूर्यदेवाने काय करावे, असे कवीने अपेक्षिले आहे ?

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. आपल्या गावाची महती वर्णन करणारे पत्र आपल्या मित्रास लिहा.

२. कवी गोविंदाग्रज यांचे 'महाराष्ट्र गीत' मिळवा आणि ते पाठ करा.



# ५. कळ्यांची फुले कशी झाली ?

**गोविंदाग्रज** (राम गणेश गडकरी : १८८५-१९१९ ) कवी, नाटककार आणि विनोदी लेखक. 'वाग्वैजयंती' हा त्यांचा कवितासंग्रह. 'महाराष्ट्र गीत', 'राजहंस माझा निजला', 'गोफ', 'प्रेम आणि मरण' इत्यादी विशेष उल्लेखनीय कविता. 'राजसंन्यास', 'प्रेमसंन्यास', 'भावबंधन', 'एकच प्याला', 'पुण्यप्रभाव' ही गाजलेली नाटके. 'वाग्वैजयंती' या काव्यसंग्रहातून ही कविता घेतली आहे.

चिमुकल्या बाळाने विचारलेल्या प्रश्नाचे आईने दिलेले काव्यमय उत्तर मुलांच्या कल्पकतेला चालना देणारे असेच असून ही कविता म्हणजे एक उत्तम निसर्गचित्र आहे.

बाळ कुणी। संध्याकाळी रमे गुणी ॥
खेळतसे। बाळ अंगणी हवे तसे ॥
बागेत। मौजेने झोके घेत ॥
तो दिसली। सुंदरशी त्याला वेली ॥
देठ कोवळे। हिरवे पिवळे। नाजुक सगळे ॥
ती वेली। हिरवा शालू पांघरली ॥१॥

परी तया। हवा सोबती खेळाया ॥
खेळगडी। मूल फूल सुंदर जोडी ॥
पाहतसे। परि वेलीला मूल नसे ॥
तिच्या कळ्या। होत्या मिटलेल्या सगळ्या ॥
जणु दमल्या। फार खेळुनी; मग निजल्या ॥
हवेत डुलणे। हेच खेळणे। खेळुनि निजणे ॥
ही त्यांची। गादी हिरव्या पानांची ॥२॥

बाळ गुणी। वाईट वाटे फार मनी ॥
दिवसभरी। खेळुनि आला परत घरी ॥
झोपेत। कितिदा गेला बागेत ॥
धीर कुठे। पहाट होता बाळ उठे ॥
बागेत। धाव तसाची तो घेत ॥
मौज ती किती। कळ्या न दिसती। फुलेच हसंती ॥
बाळ डुले। चहूकडे पाहून फुले ॥३॥

आईला। शोधाया धावत गेला ॥
मग बोले। "आई! बघ ही गोड फुले ॥
काल कळ्या। आज फुले झाल्या सगळ्या ॥
कशा उमलल्या ? कुणी हसविल्या ? हासत बसल्या ॥
कशा कळ्या ? आई सांग मला, सगळ्या ?" ॥४॥

मग आई। बाळाला उत्तर देई ॥
"खेळासी। जमति चांदण्या आकाशी ॥
त्या हसती। चहूकडे पाहत बसती ॥
तो दिसल्या। कळ्या बिचाऱ्या हिरमुसल्या ॥
कळवळल्या। फार चांदण्या मग रडल्या ॥
आसू पडले। ते दव झाले। धावत आले ॥
भुईवरी। पडले साऱ्या कळ्यांवरी ॥५॥

तो साचा। रंग पांढरा ताऱ्यांचा ॥
कळ्यांवरी। चहूकडे जाउनि पसरी ॥
मग हसल्या। कळ्या फुले हसता झाल्या" ॥
सर्व असे। आई बाळा सांगतसे ॥
ऐकुनि हे। बाळ तिच्या वदना पाहे ॥
का न कळे। मिठी मारिली तिला बळे ॥
त्या काळी। आई आनंदे हसली ॥

हसता रडली। आसवे पडली। त्याच्या गाली॥
तो साची। कळी उमलली बाळाची! ॥६॥

**प्रश्न :**

खालील प्रश्नांची थोडक्यात उत्तरे द्या.

१. बाळाने बागेत गेल्याचे स्वप्न केव्हा व का पाहिले ?

२. आईने बाळाच्या 'कळ्या कशा उमलल्या' या प्रश्नाचे उत्तर काय दिले ?

३. बाळाला आनंद केव्हा व का झाला ?

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. खालील ओळींचा अर्थ स्पष्ट करा.

अ. ती वेली। हिरवा शालू पांघरली.

आ. परि वेलीला मूल नसे.

इ. आसू पडले, ते दव झाले.

२. कळी उमलणे, कळवळणे, हिरमुसणे, मिठी मारणे या शब्दसमूहांचा वाक्यांत उपयोग करा.

३. 'बागेतील सहल' या विषयावर पंधरा वाक्यांत तुमचा स्वतःचा अनुभव लिहा.

४. वेगवेगळ्या फुलांच्या कळ्यांची चित्रे काढा / जमवा.





# ६. कशाले काय म्हनू नही

**बहिणाबाई चौधरी** (बहिणाबाई नथुजी चौधरी : १८८०-१९५१ ) प्रतिभाशक्ती ही दैवी देणगी असते याची प्रचिती यांच्या कवितेतून येते. बहिणाबाईंची कविता म्हणजे उत्तम विचारघनच होय. जीवनाचे तत्त्वज्ञान त्यांनी अत्यंत सहज, सोप्या भाषेत मांडले आहे. 'बहिणाबाईंची गाणी' या पुस्तकात त्यांच्या कविता संग्रहित केल्या आहेत. त्यातूनच ही कविता घेतली आहे.

साध्या साध्या उदाहरणांच्या माध्यमाद्वारे जीवनाचे वास्तव दर्शन या कवितेतून घडवले आहे.

निजवते भुक्या पोटी
तिले रात म्हनू नही
आखडला दानासाठी
त्याले हात म्हनू नही ॥१॥

ज्याच्यामधी नही पानी
त्याले हाय म्हनू नही
धावा ऐकून आडला
त्याले पाय म्हनू नही ॥२॥

दुधावर आली बुरी
तिले साय म्हनू नही
जिची माया गेली सरी
तिले माय म्हनू नही ॥३॥

इमानाले इसरला
त्याले नेक म्हनू नही
जल्मदात्याले भोवला
त्याले लेक म्हनू नही ॥४॥

ज्याच्यामधी नही भाव
त्याले भक्ती म्हनू नही
ज्याच्यामधी नही चेव
त्याले शक्ती म्हनू नही ॥५॥

**प्रश्न :**

खालील प्रश्नांची थोडक्यात उत्तरे द्या.

१. हात आणि पाय या अवयवांजवळ कोणते गुण असावेत, असे बहिणाबाई सांगतात ?

२. माय, नेक व शक्ती यांची कवितेत आलेली वैशिष्ट्ये सांगा.

३. भाव-भक्ती, बाप-लेक यांच्या संबंधात बहिणाबाई काय म्हणतात ?

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. खालील ओळींचा अर्थ सांगून स्पष्टीकरण करा.

अ. जिची माया गेली सरी
तिले माय म्हनू नही ॥

आ. जल्मदात्याले भोवला
त्याले लेक म्हनू नही ॥

२. 'न ऋण जन्मदेचे फिटे' या ओळींतील आशयाचा पंधरा ओळींपर्यंत विस्तार करा.

३. 'आई', 'प्रामाणिकपणा', 'प्रेम' या शब्दांवरील सुविचारांचा संग्रह करून शिक्षकांना दाखवा.

४. वाचा – ज्या नदीचे झाले गटार, तिला नदी म्हणू नये ।
जिथे नाहीत झाडे, त्याला जंगल म्हणू नये ।
जिथे नाही स्वच्छता, त्याला गाव म्हणू नये ।



# ७. मानवता

**अनिल** (आत्माराम रावजी देशपांडे : १९०१-१९८२ ) मुक्तछंदाचे पुरस्कर्ते. 'फुलवात', 'पेर्ते व्हा', 'सांगाती', 'दशपदी' हे त्यांचे काव्यसंग्रह. 'भग्नमूर्ती', 'निर्वासित चिनी मुलास' ही त्यांची दीर्घ काव्ये प्रसिद्ध. 'दशपदी' या त्यांच्या कवितासंग्रहास साहित्य अकादमीचे पारितोषिक मिळाले आहे.

ही कविता व्हीनस प्रकाशन, पुणे यांनी छापलेल्या 'पेर्ते व्हा' या कवितासंग्रहातून घेतली आहे.

अन्याय घडो कोठेही, चिडून उठू आम्ही
घाव पडो कोठेही, तडफडू आम्ही

हाल पाहून हळहळू, होवोत कोठेही
पिळवणूक पाडील पीळ आम्हा, असो कोणाचीही

वजन आमच्या छातीवर, पायांतल्या बेड्यांचे दासांच्या
चाबूक उडो कोठेही, वळ पाठीवर आमच्या

अवघ्या अभाग्यांचे अश्रू, उभे आमच्या डोळ्यांत
दुःखितांच्या, वेदनांच्या कळा आमच्याही उरात

संवेदना साऱ्या जगाची
हृदयात आहे भरभरून
नाते नवीन असे काही
जोडून आहोत आम्ही
मानव तेही मानव आम्ही

**प्रश्न :**

खालील प्रश्नांची उत्तरे थोडक्यात लिहा.

१. अन्याय घडला, अत्याचार झाला, हाल झाले, पिळवणूक झाली तर आम्ही काय करू असे कवी सांगत आहे ?

२. कवीच्या करुणामय मनाचे दर्शन कोणत्या कडव्यांतून दिसून येते?

३. कोणते नवीन नाते कवी सर्वांशी जोडून आहे ?

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. खालील ओळींचा अर्थ स्पष्ट करा.

अ. वजन आमच्या छातीवर, पायांतल्या बेड्यांचे दासांच्या

आ. अवघ्या अभाग्याचे अश्रू, उभे आमच्या डोळ्यांत

२. खालील शब्दांचा अर्थ सांगून त्यांचा वाक्यांत उपयोग करा.

घाव, दास, वळ, वेदना, संवेदना.

३. 'मानवता हाच खरा धर्म' या विषयावर पंधरा ते वीस वाक्यांचा परिच्छेद लिहा.

४. केशवसुतांची 'नवा शिपाई' ही कविता मिळवून वाचा. तिचा अर्थ समजावून घ्या. ती चालीवर म्हणा आणि पाठ करा.

५. 'जे का रंजले गांजले । त्यांसी म्हणे जो आपुले ॥
तोचि साधू ओळखावा । देव तेथेचि जाणावा ॥'
या मजकुराची वाक्यपट्टी तयार करून ती आपल्या घरी सर्वांना दिसेल अशा ठिकाणी लावा.



# ८. बकुळीची फुले

**ग. ल. ठोकळ** (गजानन लक्ष्मण ठोकळ: १९०९-१९८४) मराठी साहित्य क्षेत्रातील प्रसिद्ध ग्रामीण कवी आणि कथालेखक. 'मीठभाकर' हा त्यांचा कवितासंग्रह; 'कडू साखर', 'मत्स्यकन्या', 'कौंदण,' 'ठोकळ गोष्टी भाग १ ते ५' इत्यादी कथासंग्रह; 'गावगुंड', 'ठिणगी' इत्यादी कादंबऱ्या प्रकाशित. काही चित्रपटांच्या कथा, पटकथा, संवाद व गाणीही यांनी लिहिली आहेत.

दीर्घ काळपर्यंत सुगंध देणाऱ्या आणि लवकर न कोमेजणाऱ्या बकुळफुलांचे वेगळेपण या कवितेत कवीने वर्णिले आहे.

छाया गर्द सुरेख, गार हिरवी शोभे तुझी पालवी
सो सो गर्जत वाहुनी गदगदा वारा तुला हालवी।

भोती कुंपण दाट, त्यावरुनही विस्तारल्या डाहळ्या
झाला भूमिवरी किती खच तरी; पाने, फुले, पाकळ्या।

पुष्पांचे झुबके किती लहडले प्रत्येक खांदीवरी
त्यांचा गंध चहूकडे पसरला, वर्णू किती माधुरी।

छोटे गोंडस, पांढरे सुम तुझे, हुंगू किती मी तया
छोट्या, सुंदर पाकळ्या कितितरी, येती न मोजावया।

उद्यानात अनंत वृक्ष फुलले, त्यांची सुगंधी फुले
घेतो जो न करात तोच सुकती, पस्तावतो त्यामुळे।

पुष्पे वेचुनिया तुझी जर तया, मी ठेविली गुंफुनी
त्यांचा गंध अनंत काळ टिकतो, जाती न कोमेजुनी।

पुष्पांच्या तव ओंजळी तरुवरा, डोक्यावरी ठेवितो
यावज्जीव असो शिरावर तुझी छाया असे इच्छितो ।

**प्रश्न :**

खालील प्रश्नांची थोडक्यात उत्तरे द्या.

१. बकुळीच्या झाडाचे वर्णन कवीने कसे केले आहे ?
२. बकुळीची फुले आणि इतर फुले यांत कोणता फरक कवीला जाणवतो ?
३. कवी शेवटी आपली कोणती इच्छा व्यक्त करतो ?

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. समान अर्थाचे शब्द लिहा.
   वृक्ष, छाया, पुष्प, गंध, भूमी.
२. 'बालकवीं'चे बकुळीच्या फुलावरील गाणे मिळवून वाचा व पाठ करा.
३. गुलाब, मोगरा, शेवंती, झेंडू ही फुले तुमच्याशी बोलायला लागली, तर काय सांगतील ते कल्पनेने लिहा.





# १. धरण

**दया पवार** (दगडू मारुती पवार : १९३५-१९९६) दलित साहित्याच्या नव्या प्रवाहातील कवी व आत्मकथा लेखक. यांनी आपल्या लेखनातून दलितांच्या आशा-आकांक्षा व वेदना व्यक्त केल्या आहेत. 'कोंडवाडा' कवितासंग्रह; 'बलुतं' आत्मकथा इत्यादी पुस्तके प्रसिद्ध आहेत. 'बलुतं' या आत्मकथेसाठी अमेरिकेतील फोर्ड फाउंडेशनने त्यांना शिष्यवृत्ती देऊन गौरविले आहे. तसेच भारत सरकारनेही त्यांना पद्मश्री हा किताब बहाल केला आहे.

'धरण' हे त्यांचे अत्यंत लोकप्रिय गीत. कष्ट करूनही उपाशी राहणाऱ्या सामान्य कष्टकऱ्यांच्या भावना या गीतातून व्यक्त झाल्या आहेत.

बाई मी धरण, धरण बांधिते ग
माझं मरण, मरण कांडिते ग

झुंजूमुंजू ग झालं
पीठ जात्यात आटलं
कणी कोंडा ग
कोंडा मी रांधिते ॥१॥

दिस कासऱ्याला आला
जीव मागं घोटाळला
तान्हं लेकरू
लेकरू पाटीखाली मी डालते ॥२॥

काय सांगू उन्हाच्या झळा
घाव घालीत फुटे शिळा
कड दाटे कड दाटे
पायी पाला मी बांधिते ॥३॥

पेरापेरात साखर
तुमचं पिकलं शिवार
घोटभर पाण्यासाठी
सारं रान धुंडाळिते ॥४॥

वेल मांडवाला चढे
माझ्या घामाचे ग अळे
माझ्या अंगणी
अंगणी पाचोळा ग पडे ॥५॥

**प्रश्न :**

खालील प्रश्नांची थोडक्यात उत्तरे लिहा.

१. या कवितेत 'जीव मागं घोटाळला' असे ती बाई का म्हणत आहे ?
२. या कवितेतील बाई हलाखीत जगत आहे असे दिसते, कशावरून ?
३. कष्ट करून शिवार पिकवणाऱ्या बाईला घोटभर पाणी का मिळत नाही ?

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. 'बाई मी धरण, धरण बांधिते ग । माझं मरण, मरण कांडिते ग ।' या चरणाचा अर्थ स्पष्ट करा.
२. 'झुंजूमुंजू ग झालं, पीठ जात्यात आटलं' या ओळी वाचून बाईच्या कोणत्या परिस्थितीचे चित्र डोळ्यांपुढे उभे राहते, थोडक्यात लिहा.
३. झुंजूमुंजू होणे, जीव घोटाळणे, दिस कासराभर येणे या शब्दसमूहांचा वाक्यांत उपयोग करा.
४. वाचा – पाणी वाचवा, जीवन वाचवा.





# १०. मावळत्या सूर्याप्रत

**भा. रा. तांबे** (भास्कर रामचंद्र तांबे: १८७४-१९४१) वा. गो. मायदेव यांनी सन १९२० मध्ये त्यांचा कवितासंग्रह संपादून प्रकाशित केल्यानंतर कवी म्हणून प्रसिद्ध. 'तांबे यांची समग्र कविता' या संग्रहात सर्व काव्यलेखन समाविष्ट.

त्यांनी प्राधान्याने धृपदयुक्त गेयरचना केलेली आहे. त्यांची प्रेमगीते विशेष लोकप्रिय झाली. त्यांच्या भावगीत रचनाशैलीचा प्रभाव नंतरच्या कवींवर पडलेला आढळतो.

सूर्याचे गुणवर्णन या कवितेत साधले असले तरी मानवी स्वभावातील वैगुण्यांचीही जाणीव या कवितेत कवीने करून दिली आहे. सूर्य हा सर्वांबाबत समदर्शी आहे. मानवानेही तसेच व्हावे, असे या कवितेत पर्यायाने सूचित करण्यात आले आहे.

मावळत्या दिनकरा, अर्घ्य तुज जोडुनि दोन्ही करां ॥धृ॥
जो तो वंदन करी उगवत्या,
जो तो पाठ फिरवि मावळत्या,
रीत जगाची ही रे सवित्या
स्वार्थपरायणपरा ॥१॥

उपकाराची कुणा आठवण ?
'शिते तोवरी भुते' अशी म्हण;
जगात भरले तोंडपुजेपण,
धरी पाठिवर शरा ॥२॥

असक्त परि तू केलिस वणवण,
दिलेस जीवन, हे नारायण,
मनी न धरिले सानथोरपण,
समदर्शी तू खरा ॥३॥

प्रभु-सचिवा विरही मुखधूसर
होति दयामृदु नयनिष्ठुर कर
कारभार टाकुनि चंद्रावर
चाललास तू खरा ।।४।।

**प्रश्न :**

खालील प्रश्नांची थोडक्यात उत्तरे लिहा.

१. कवीने जगाची कोणती रीत सांगितली आहे ?
२. सूर्य समदर्शी आहे, असे कवी का म्हणतो ?
३. अखेरच्या काळातील माणसाच्या परिस्थितीचे वर्णन कवीने कसे केले आहे ?

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. उपकारकर्त्यांची जग आठवण ठेवत नाही, यासाठी कवीने कोणती म्हण वापरली आहे ? तिचा अर्थ स्पष्ट करा.
२. सूर्याबद्दल कवितेत आलेले तीन शब्द लिहा.
३. अंतकाळी कर्तृत्ववान माणूसही सर्व भार दुसऱ्यावर सोपवून निघून जातो, या अर्थाच्या कवितेत आलेल्या ओळी लिहा.
४. उगवत्याला नमस्कार करणे, मावळत्याकडे पाठ फिरवणे, तोंडपुजेपण करणे या शब्दसमूहांचा अर्थ सांगून वाक्यांत उपयोग करा.
५. 'जो तो वंदन करी उगवत्या' या कल्पनेचा विस्तार पंधरा ते वीस वाक्यांत करा.





# ११. सोहळा

**वृंदा लिमये** (वृंदा रघुनाथ लिमये: जन्म १९३०) साहित्य समीक्षा, बालकविता इत्यादी क्षेत्रांत लेखन करणाऱ्या कवयित्री. 'काळोख कमळ' हा त्यांचा प्रसिद्ध कवितासंग्रह.

ही कविता 'काळोख कमळ' या त्यांच्या काव्यसंग्रहातून घेतली आहे. वर्षाकाळातील निसर्गाच्या हिरव्या सोहळ्याचे सौंदर्यवर्णन या कवितेत केले आहे.

नभ झाकळलेले वरती
मन धूसर आणि ढगाळ
गिरिशिखरांवरती धुंद
ओथंबुन वर्षाकाळ

सळसळत्या हिरव्या लाटा
बेहोष पिंउनिया वारा
सर झिमझिमणारी मंद
मोत्यांचा उधळित चारा

लावण्य पोपटी गर्द
रसरसले रानोमाळ
अन् कडेकपारींमधुनी
इवलाले शुभ्र खळाळ

मेघांचे काजळ काळे
घालुनिया डोळे निवले
हा मुग्ध सोहळा हिरवा
मौनाला अंकुर फुटले

**प्रश्न :**

खालील प्रश्नांची थोडक्यात उत्तरे द्या.

१. कवयित्रीने आपली मनःस्थिती व निसर्गातील स्थिती यांत कोणते साम्य दाखवलेले आहे ? कसे ते सांगा.

२. सृष्टीच्या सोहळ्यात पावसाची सर, ओहळ हे काय करत आहेत ?

३. कवयित्रीने शेवटी 'मौनाला अंकुर फुटले' असे का म्हटले आहे?

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. सृष्टीत चाललेल्या वर्षाकालीन सोहळ्याचे वर्णन तुमच्या शब्दांत लिहा.

२. हिरव्या लाटा, मोत्यांचा चारा, काजळ हे शब्द कवयित्रीने कोणासाठी वापरले आहेत ते सांगा.

३. गिरिशिखर, वर्षाकाळ, लाट, नभ, ढग या शब्दांची सामान्य रूपे लिहा.

४. 'मी पाहिलेला एक रम्य देखावा' या विषयावर निबंध लिहा.





# १२. धरणी ती माय कोपली का ?

**फ.मुं. शिंदे** (फकीरराव मुंजाजी शिंदे : जन्म १९४८) दलित व बहुजन यांच्या चळवळीत व लेखनात अग्रेसर असलेले नव्या पिढीतील तरुण प्रथितयश कवी. 'अवशेष', 'जुलूस', 'सार्वमत', 'आदिम', 'वृंदगान', 'आई आणि इतर कविता' इत्यादी कवितासंग्रह आणि 'स्वान्त' हा समीक्षा लेखसंग्रह प्रसिद्ध.

'भूकंपाची गाणी' या काव्यसंग्रहातून ही कविता घेतली आहे.

३० सप्टेंबर, १९९३ रोजी मराठवाड्यातील किल्लारी व इतर खेड्यांत भूकंप होऊन मोठ्या प्रमाणावर जीवित व वित्तहानी झाली. या पार्श्वभूमीवर ही कविता लिहिलेली आहे.

जीव-जनावरा। देत आली ठाय
धरणी ती माय। कोपली का ? १

स्वप्न पहाटेचे। खरेच होणारे
घरातले सारे। गोड स्वप्नी २

पाहता पाहता। दृष्टी गेली पार
सकाळी अंधार। अनंताचा ३

दुष्ट कसा होतो। अनंतही अंती
गेले त्यांना शांती। कशी आता ? ४

मातीला जे होते। दगड धरून
त्यांचेही भरून। आले मन ५

परास्त होऊन आणि कोसळले
अश्रू ओघळले। अखेरचे ६

मातीचे पाईक । मातीखाली मेले
असे कसे गेले । कष्टवंत ? ७

खेड्याचे या कसे । भाग्य असे खोटे
सूर्यास्त पहाटे । पाहण्याचे ८

कोणती अशी ही । धरतीची माया
काळीकुट्ट छाया । मरणाची ९

गेले त्यांना आता । कुणी कसे गावे ?
पुन्हा उगवावे । जोमदार ! १०



**प्रश्न :**

खालील प्रश्नांची थोडक्यात उत्तरे लिहा.

१. प्राणिमात्रांना आश्रय देणारी धरणीमाय कशी आणि केव्हा कोपली ?

२. 'दुष्ट कसा होतो। अनंतही अंती,' असे कवीने का म्हटले आहे ?

३. या कवितेत कवी कोणता आशावाद व्यक्त करतो ?

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. खालील ओळींचा अर्थ स्पष्ट करा.

अ. मातीला जे होते। दगड धरून
त्यांचेही भरून। आले मन

आ. खेड्याचे या कसे। भाग्य असे खोटे
सूर्यास्त पहाटे। पाहण्याचे

२. महाराष्ट्रात अनेक ठिकाणी अनेकदा लहान-मोठे भूकंप झाले. त्यांची माहिती मिळवून वहीत नोंद करा.

३. भूकंपग्रस्त भागातील बेघर झालेल्या लोकांसाठी तुम्ही कोणती मदत कराल ते थोडक्यात लिहा.



# १३. ही माती

**पंडित आवळीकर** (दत्तात्रेय नरहर आवळीकर : १९३१-२००२) कर्नाटक विद्यापीठात मराठीचे प्राध्यापक म्हणून यांनी काम केले. कन्नड, मराठी व इंग्रजी या भाषांतून लेखन.

'श्रेयसी' या कवितासंग्रहातून ही कविता घेतली आहे. स्वतंत्र भारतमातेच्या मातीची महती व तिची वैशिष्ट्ये या कवितेत वर्णिलेली आहेत.

ज्या मातीवर आज उभा मी ताठ ठेवुनी मान
आसेतुहिमाचल ही माती जिचा मला अभिमान

या मातीचा रंग निराळा निराळाच गंध
रंगागंधामध्ये वेगळ्या एक भावबंध

या मातीची जरी आढळे भिन्न वेशभूषा
हृदय एक पण ओठांवरती जरी भिन्न भाषा

या मातीवर खिळले ज्यांचे लाल लाल डोळे
घ्यावे त्यांनी सदैव ध्यानी काय इथे घडले

जिंकायाला कोणी येता अजिंक्य ही ठरते
लाख शिकंदर आक्रमकांना पुरून ही उरते

सूर्य कुणाच्या साम्राज्यावर कधी न मावळला
तो मावळला या मातीवर गर्व गळुनि सगळा

ज्या मातीवर आज उभा मी ती 'असली' माती
या मातीची स्वतंत्रतेच्या स्वर्गाशी नाती!

**प्रश्न :**

खालील प्रश्नांची थोडक्यात उत्तरे लिहा.

१. आपल्या देशाची कोणती वैशिष्ट्ये या कवितेत नमूद करण्यात आलेली आहेत ?

२. भारत-भू जिंकण्यासाठी कोणी कोणी प्रयत्न केले ? त्यांचे काय झाले ?

३. सूर्य कुणाच्या साम्राज्यावर कधी न मावळला। तो मावळला या मातीवर गर्व गळुनि सगळा, असे कोणाला उद्देशून म्हटले आहे ? का ?

४. 'या मातीची स्वतंत्रतेच्या स्वर्गाशी नाती' म्हणजे काय ? ते सांगा.

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. खालील कडव्यांचा अर्थ स्पष्ट करा.

अ. 'या मातीचा रंग निराळा, निराळाच गंध। रंगागंधामध्ये वेगळ्या एक भावबंध।

आ. या मातीची जरी आढळे भिन्न वेशभूषा। हृदय एक पण ओठांवरती जरी भिन्न भाषा।

२. खालील शब्दसमूहाचा अर्थ स्पष्ट करून त्यांचा वाक्यांत उपयोग करा.

मान ताठ ठेवणे, डोळे खिळणे, पुरून उरणे, गर्व गळणे.

३. या कवितेच्या आधारे 'भारत देश महान' या विषयावर एक परिच्छेद लिहा.

४. 'आसेतुहिमाचल' या शब्दाची फोड करून त्याचा अर्थ सांगा.

५. पहिला पाऊस पडल्यानंतर मातीचा सुगंध कसा येतो याचा अनुभव घ्या.





# १४. फिटे अंधाराचे जाळे

**सुधीर मोघे** (सुधीर राम मोघे: जन्म १९३९) यांनी चित्रपट गीते लिहून त्या क्षेत्रात वैशिष्ट्यपूर्ण कामगिरी केली आहे. चित्रपट गीत लेखनासाठी चार वेळा राज्य पुरस्कार प्राप्त.

पहाटल्यानंतरचे रम्य वर्णन या कवितेत आहे.



फिटे अंधाराचे जाळे
झाले मोकळे आकाश
दरी खोऱ्यातून वाहे
एक प्रकाश प्रकाश ॥धृ॥



रान जागे झाले सारे
पायवाटा जाग्या झाल्या
सूर्य जन्मता डोंगरी
संगे जागल्या साऊल्या
एक अनोखे लावण्य
आले भरास भरास ॥१॥



दंव पिऊन नवेली
झाली गवताची पाती
गाणी जुनीच नव्याने
आली पाखरांच्या ओठी
क्षणापूर्वीचे पालटे
जग उदास उदास ॥२॥

झाला आजचा प्रकाश
जुना कालचा काळोख
चांदण्याला किरणांचा
सोनसळी अभिषेक
सारे रोजचे तरीही
नवा सुवास सुवास ॥३॥

**प्रश्न :**

खालील प्रश्नांची थोडक्यात उत्तरे लिहा.

१. या कवितेत कवीने पहाटेच्या वेळचे वर्णन केले आहे, हे कोणत्या कडव्यातून स्पष्ट होते ?
२. क्षणापूर्वीचे उदास जग पालटून गेले असे कवीला का वाटते ?
३. 'सारे रोजचे तरीही नवा सुवास' असा अनुभव कवीने का नोंदला आहे, ते सांगा.

**स्वाध्याय व उपक्रम :**

१. खालील कडव्याचा अर्थ स्पष्ट करा.
रान जागे झाले सारे
पायवाटा जाग्या झाल्या
सूर्य जन्मता डोंगरी
संगे जागल्या साऊल्या
एक अनोखे लावण्य
आले भरास भरास

२. खालील चरणांतील कल्पनेचा विस्तार करा.
'चांदण्याला किरणांचा
सोनसळी अभिषेक'

३. 'एक रम्य पहाट' या विषयावर पंधरा-वीस वाक्यांचा एक परिच्छेद लिहा.

४. 'घनश्याम सुंदरा' ही भूपाळी मिळवून वाचा. समजून घ्या, पाठ करा.

५. पहाटेच्या वेळी पक्ष्यांचा किलबिलाट ऐका व त्यांच्या आवाजावरून पक्षी ओळखण्याचा प्रयत्न करा.

□□□



# १५. विद्याप्रशस्ती

वामन पंडित (१६०८-१६९५) संत कवींप्रमाणेच पंडित कवींचीही परंपरा प्राचीन मराठी कवितेत होऊन गेली. वामन पंडितांनी पुराणांतील विषयांवर स्फुटकाव्ये लिहिली आहेत. ज्ञानेश्वरांनी गीतेवर 'भावार्थदीपिका' या नावाने टीका लिहिली, तर वामन पंडितांनी ती 'यथार्थदीपिका' या नावाने लिहिली.

भर्तृहरी नामक संस्कृत कवीच्या 'नीतिशतक' या पुस्तकाचा मराठी अनुवाद वामन पंडितांनी केला आहे. त्यातून पुढील काही श्लोक निवडले आहेत. विद्येचे महत्त्व या श्लोकांत वर्णिलेले आहे.

(१)

विद्या हे पुरुषास रुप बरवे, की झाकले द्रव्यही,
विद्या भोग सुकीर्तिदायक, पहा ते मान्य मान्यांसही,
विद्या बंधु असे विदेश गमनी, विद्या महादेवता,
विद्या पूज्य नृपास, हा नरपशू तीवेगळा तत्त्वता

(२)

न चोराला लाधे, प्रकट न दिसे, दे सुख सदा,
दुणावे की देता, किमपि न सरे लेशहि कदा
न कल्पांती पावे निधन धन विद्याभिध असे,
असे ज्यांचे, त्याशी प्रतिभटति ते पामर पिसे

(३)

विपत्काळी धैर्य, प्रभुपणि सहिष्णुत्व बरवे,
सभे पांडित्याचा प्रसर, समरी शौर्य मिरवे
सुकीर्तीच्या ठायी प्रचुर रति, विद्या-व्यसन जे,
तयांचे हे स्वाभाविक गुण सहा सत्पुरुष जे

प्रश्न :

खालील प्रश्नांची उत्तरे थोडक्यात लिहा.

१. विद्येची प्रशस्ती कवितेत कोणत्या प्रकारे वर्णिलेली आहे ?
२. सत्पुरुषांच्या ठायी असणाऱ्या कोणत्या सहा गुणांचा उल्लेख कवीने केलेला आहे ?
३. कवीने कोणाला 'पामर पिसे' असे म्हटले आहे ?

स्वाध्याय व उपक्रम :

१. 'विद्वान सर्वत्र पूज्यते' या वचनाचा दहा ते पंधरा वाक्यांत विस्तार करा.
२. विद्येने मनुष्याला मोठेपण प्राप्त होते, हा विचार समजावून देणारे पत्र तुमच्या मित्रास लिहा.
३. शाळा सोडून गेलेल्या मुलाला त्याने पुन्हा शाळेत यावे,यासाठी तुम्ही त्याला काय काय सांगाल ? मुद्दे लिहा.
४. विद्या प्राप्त करून जीवनात यशस्वी झालेल्या आपल्या परिसरातील व्यक्तींची माहिती मिळवून ती वर्गात सांगा.

# शब्दार्थ

**पाठातील संदर्भानुसार शब्दांचे अर्थ दिले आहेत.**

## अ

**अन्नदा** - अन्न देणारी
**अनमोल** - ज्याची किंमत करता येणार नाही इतके किमती
**अनिर्वचनीय** - शब्दांतून व्यक्त करता न येण्यासारखे
**अनोखे** - अनोळखे, नवे
**अन्योन्याश्रय** - एक दुसऱ्यावर अवलंबून असणे
**अभिवचन** - आश्वासन
**अभिवादन** - नमस्कार
**अमानुष** - हिंसक
**अलौकिक** - असामान्य
**अवलिया** - सत्पुरुष
**असक्त** - निरिच्छ
**अस्ताव्यस्त** - इकडे तिकडे विखुरलेले
**अंकुरणे** - उगवणे
**अंती** - शेवटी

## आ

**आगोट** - पावसाळ्याचा आरंभ, पेरणी-लावणीचा हंगाम
**आटाला** - व्याप, पसारा
**आंबलेली माणसे** - जीवनाला कंटाळलेली माणसे
**आपद्ग्रस्त** - आपत्तीत सापडलेले
**आवण** - रोपे लागवडीची जमीन
**आसेतुहिमाचल** - कन्याकुमारीपासून हिमालयापर्यंत
**ओक्साबोक्सी रडणे** - मोठ्याने रडणे

## इ

**इन्फंट्री** - पहिलीच्या आधीचा वर्ग
**इसरला** - विसरला
**इरली** - पाऊस लागू नये म्हणून डोक्यावर घ्यायचे आच्छादन

## उ

**उपजत** - जन्मतः, स्वाभाविक
**उन्मीलित** - विकसित

## क

**कद्रू** - कंजूष
**कनवाळू** - दयाळू
**करपल्लवी** - हाताने केलेल्या खाणाखुणांची भाषा
**करारी** - निश्चयी
**कल्पतरू** - कल्पिलेले देणारा वृक्ष (कविकल्पना)
**कल्पांती** - जगाच्या अंतापर्यंत
**कवळ फोडणे** - मातीचा ढेकूळ फोडणे
**कष्टवंत** - कष्ट करणारे
**कळंभ** - स्पर्धा
**कळा** - कला, सोंगे
**काजवा** - एक कीटक (अंधारात चमकतो)
**कानगोष्टी** - कानात सांगण्यासारखी गोष्ट
**कुतूहल** - जिज्ञासा
**कुळवाडी** - शेतीकाम करणारे

### ख

**खटकणे** - न आवडणे

**खुर** - जनावरांच्या तळपावलांचा टणक भाग

**खुराक** - शरीराच्या पुष्टीसाठी द्यायचा आहार

**खुशमस्करे** - हांजी हांजी करणारे

**खोंड** - जवान बैल

### ग

**गचवाटा घेणे** - गालगुच्चा घेणे

**गटळं** - गाठोडे

**गर्दन** - मान

**गाढी श्रीमंती** - खूप श्रीमंती

**गाबागाब होणे** - भीतीने घाबरून जाणे

**गिरिशिखर** - पर्वताचा उंच भाग

**गुळचट** - गोडसर

**घ्राणासि** - घ्राणेंद्रियाशी

### च

**चकवे** - लावणीची गाणी

**चतुरस्र** - पारंगत

**चिकित्सक** - परीक्षा घेणारा

**चिंतामणी** - चिंतिलेले देणारा मणी

**चूड** - आग लावण्यासाठी तयार केलेली दिवटी

**चैतन्य** - उत्साह

**चोंढा करणे** - भाताचे लहान शेत तयार करणे

**चोंढा चोखाळणे** - शेतीची मशागत करणे

**चौर्यकर्म** - चोरून केलेले काम

### ज

**जंगी** - मोठी

**जिज्ञासू** - जाणून घेण्याची इच्छा असणारा/री

**जुजबी** - किरकोळ, बेताचे

### झ

**झुंजूमुंजू** - पहाट

### ट

**टिक्कीचा पाला** - एक प्रकारचा झाडपाला

### ड

**डालते** - झाकते

**डाहळ्या** - फांद्या

**डिरकी** - बैलाने काढलेला विशिष्ट प्रकारचा आवाज

### त

**तणवणे** - जमिनीवर गवत पसरून देणे

**तरूवर** - श्रेष्ठ वृक्ष, बकुळीचे झाड

**तंदुरुस्त** - निरोगी, निकोप

**तावदारणे** - रागावून, खेकसून बोलणे

**तुस्त** - शरीराने पुष्ट

**तेजी** - भरभराटी, महागाई

**तोंडपुजेपणा** - खोटी स्तुती

**तोळे** - सोने व चांदी तोलण्याचे एक परिमाण (१ तोळा = सुमारे १० ग्रॅम)

### द

**दयामृदू** - दयाळू

दरारा - धाक, दबदबा
दिग्गज - थोर पुरुष
दिनकर - सूर्य
दिव्य - कठीण परीक्षा, कसोटी
दिस कासऱ्याला येणे - सूर्य हातभर वर येणे
दुणावणे - वाढ होणे, दुप्पट होणे
दूधखुळा - अज्ञानी
दुभाषे - दोन भाषा जाणणारे
दुभती - दूध देणारी
दुर्मिळ - मिळण्यास कठीण

**ध**

धुंडाळणे - शोधणे
धूसर - धुरकट

**न**

नय - न्याय
नाना कळा - अनेकविध कला
नामी - इरसाल, चांगले
निगराणी करणे - काळजी घेणे, देखरेख करणे
नितळाई - स्वच्छ
निरलस आनंद - उद्योगी माणसाच्या चेहऱ्यावरील आनंद
नि:स्पृह - निरिच्छ
नृप - राजा
नेक - प्रामाणिक
नेत्रपल्लवी - डोळ्यांच्या खुणांची भाषा

**प**

पगडा - प्रभाव
पंचक्रोशीत - पाच कोसांच्या आत (कोस–अंतर मोजण्याचे जुने परिमाण)
पर्वणी - खूप दिवसांनी येणारा शुभकाळ
परवड - वाईट अवस्था
परस्त - दूर लोटले गेलेले, पराभूत
परसात - घराच्या मागे, भोवती आवार घालून ठेवलेल्या मोकळ्या जागेत
परिमळ - सुगंध
पक्षकार - न्यायाच्या कचेरीत आपली बाजू मांडणारे वादी / प्रतिवादी
पाईक - सेवक
पाक - सगळा, स्वच्छ
पाटी - टोपली
पातेरी करणे - पालापाचोळा, टरफल, गवत इत्यादी जमिनीवर पसरणे
पामर - क्षुद्र, तेजोहीन
पिसे - वेड, भ्रम
पुस्तकाची चळत - पुस्तकांचा ढीग
पेंढा भरलेला - भाताचे तण भरलेला
पोक्त - अनुभवी
प्रचुर - पुष्कळ
प्रभुसचिव - विश्वाचा सचिव —सूर्य
प्रभृती - इत्यादी
प्रतिभटणे - स्पर्धा, बरोबरी करणे
प्रायश्चित्त - शिक्षा, पापक्षालनार्थ करायचे विधियुक्त कर्म

**ब**

बक्कळ - खूप
बहुशाख - अनेकविध शाखांनी युक्त
बिकट प्रसंग - कठीण प्रसंग
बुरी - बुरशी
बेहोश होऊन - शुद्ध हरपून
बोधदाता - बोध (ज्ञान) देणारा

### भ

**भरडा** - जाड असे दळलेले धान्य
**भरतवाक्य** - शेवटचे पद
**भवति न भवति** - 'होय', 'नाही'
**भावज्ञ** - भाव जाणणारा
**भाषेच्या खोडी** - भाषेची वैशिष्ट्ये
**भूपाळी** - भूप रागातील पहाटे म्हणायचे गीत
**भूमिदास** - शेतकरी
**भोती** - भोवती
**भ्रमनिरास होणे** - वास्तवाची कल्पना येणे
**भ्रामक** - खोटी

### म

**मधुप्रलापी** - मधुर भाष्य करणारे
**मनसोक्त** - यथेच्छ, स्वैरपणे
**मनोदय** - हेतू
**मनोधर्म** - स्वभाव
**मंत्रमुग्ध होणे** - एखाद्या गोष्टीने भारावून स्तब्ध राहणे
**मर्म** - रहस्य
**माधुरी** - गोडी
**मायभाषा** - मातृभाषा
**मान्यांस** - श्रेष्ठ जनांस
**मुग्ध** - सुंदर
**मुलखावेगळा** - सर्वांपेक्षा वेगळा
**मैतर** - मित्र
**मौक्तिक** - मोती

### य

**यावज्जीव** - जीव असे तोपर्यंत

### र

**रमे** - रमत असे
**रसना** - जिव्हा, जीभ
**रंधा** - सुतारकामातील एक हत्यार
**राखोळी** - गाय, म्हैस इत्यादी जनावरांना दिवसभर चारापाणी करून सांभाळण्यासाठी पगारावर नोकर ठेवणे
**राब** - तयार केलेला मातीचा गाळ
**रूढी** - वहिवाट
**रेटा** - जोराचा धक्का
**रोट** - भाकरीसारखा भाजलेला जाड कणकेचा गोळा
**रोकडा** - साक्षात
**रोमांचकारी** - आनंदातिशयाने अंगावर शहारे उभे करणारा

### ल

**लगट** - जवळ बसणे, जवळीक साधणे
**लहडणे** - बहरणे
**लाधे** - लाधणे - लाभणे
**लावण्य** - सौंदर्य
**लेक** - मुलगा
**लेश** - अतिशय कमी

### व

**वाखफडा** - घायपात, एक वनस्पती
**विदेशगमन** - परदेशात जाणे
**विपत्ती** - संकट, अडचणी
**विपत्काळ** - संकटकाळ
**वृद्धिंगत होणे** - वाढ होणे

**स**

**समदर्शी** - सर्वांना समान वागणूक देणारा
**समरी** - युद्धात
**सविता** - सूर्य
**सहिष्णु** - उदार
**साचा** - खरोखर
**सान थोरपण** - लहान थोरपण
**सांप्रत** - सध्या
**स्फुल्लिंगाप्रमाणे** - विस्तवाच्या ठिणगीप्रमाणे
**स्वार्थपरायणपरा** - स्वतःपुरता न पाहणारा

**ह**

**हरपून** - हरवून
**हाय (हाळ)** - गुरांसाठी बांधलेला पाण्याचा मोठा हौद
**हिरमुसणे** - निराश होणे

---

टिपा :

(१) **ठासणीची बंदूक** - पूर्वीच्या काळी ठासणीच्या बंदुका असत. बंदुकीच्या नळीत बारूद भरून लोखंडी गजाने ठासत. बंदुकीच्या बारूद भरलेल्या भागाशेजारी घोडा (खटका) असतो. तो ओढला की बार होऊन गोळी दूरवर जात असे.

(२) **तपोवन, दाजीसाहेब** - डॉ. शिवाजीराव पटवर्धन ऊर्फ दाजीसाहेब यांनी अमरावती येथे 'तपोवन' उभे केले. तपोवन म्हणजे तपस्वी लोकांचे राहण्याचे ठिकाण. या तपोवनात कुष्ठरोगी राहतात. या कुष्ठरोग्यांची देखभाल करण्यासाठी दाजीसाहेबांनी आपले आयुष्य वेचले.

(३) **मुंबई नॅचरल हिस्टरी सोसायटी** - जीवविज्ञानविषयक लोकशिक्षणाचे आणि संशोधनात्मक कार्य करणारी मुंबई येथील संस्था.

(४) **मृगोदरातील कस्तुरी** - मृगाच्या उदरातील कस्तुरी. कस्तुरीचा सुगंध साऱ्या आसमंतात दरवळत असतो. मृगाला मात्र याची कल्पना नसल्याने तो इतरत्र शोधत फिरतो.

---

**वाक्प्रचार :**

**आचारी का बिचारी होणे** - काही सुचेनासे होणे
**आनंदाने फुलून येणे** - खूप आनंद होणे
**आनंदाला पारावार न उरणे** - अतिशय आनंद होणे
**आवंढा गिळणे** - दुःख आवरणे
**उत्साहाचे भरते येणे** - अतिउत्साह वाटणे
**एरंडाचे गुऱ्हाळ गाळणे** - व्यर्थ बडबड करणे
**जीव मुठीत धरणे** - जिवास जपणे
**डोक्यात प्रकाश पडणे** - बरोबर लक्षात येणे
**डोळे लावून बसणे** - वाट बघणे

□□□

